


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

**संपादक :** प्र० ना० परांजपे

**संपादन-सल्लागार :** अशोक रा० केळकर, कृष्ण श्री० अर्जुनवाडकर, आशा मुंडले, द० भि० कुलकर्णी, मॅक्सीन बर्नसन

**संपादन-समिती :** प्र० ना० परांजपे (प्रमुख), नीलिमा गुंडी, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर

**लेखन व परीक्षणार्थ पुस्तके पाठविण्याचा पत्ता :** प्र० ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.
दूरभाष : (020) 2569 4617 भ्रमणभाष : 94225 09638

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :**
आनंद काटीकर, द्वारा, मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004. भ्रमणभाष : 94216 10704

**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051. दूरभाष : 2434 8756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या **www.marathiabhyasparishad.com** या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 93731 04903 **विजय पाध्ये** - 98220 31963.

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी **पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर** असे आहे. वार्षिक वर्गणी- **संस्थेला** रु० १२५/-, पंचवार्षिक वर्गणी रु० ५५०/-, **व्यक्तीला** रु० १००/-; पंचवार्षिक वर्गणी रु० ४५०/- **परदेशात** अंक पाठविण्यासाठी वार्षिक टपालखर्च रु० १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु० १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु० १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने. किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. (पाठवल्यास आपला पत्ता पिनकोड क्रमांकासह न विसरता लिहावा.)** धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत रु० ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु० २,५००/-, अर्धे पान रु० १,५००/-, पाव पान रु० ८००/-, शुभेच्छा रु० ४००/-, आवरण पृष्ठ तीन रु० ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

प्रकाशन : त्रैमासिक : जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी)
सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य रु० २५/-**

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका

# आवाहन

१९८३ पासून, मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने 'भाषा आणि जीवन' हे भाषाविषयक त्रैमासिक चालवले जाते आणि सर्व आजीव सभासदांना वेगळी वर्गणी न घेता पाठवले जाते. भाषिक सजगता वाढवण्याच्या संस्थेच्या प्रयत्नांना दिलेल्या या अमूल्य सहकार्याबद्दल संस्था आजीव सभासदांची ऋणी आहे.

गेल्या काही वर्षांपासून अंकाची पृष्ठसंख्या वाढलेली आहे. या वाढत्या पृष्ठसंख्येमुळे कागदाचे वाढलेले दर, वाढता मुद्रणखर्च यांचा ताण संस्थेच्या आर्थिक व्यवस्थापनावर पडतो आहे. भरीस भर म्हणून पृष्ठसंख्या किंवा / आणि अंकाची किंमत वाढवली की टपालखर्चातही वाढ होते. या गोष्टींचा विचार करून ज्या आजीव सभासदांनी यापूर्वी रु० ६०० एवढी आजीव सभासद वर्गणी भरलेली आहे त्यांनी कृपया ऊर्वरित रु० ४०० ही आजीव सभासद वर्गणी भरावी असे आवाहन करत आहोत. आपण या आवाहनाला सकारात्मक प्रतिसाद द्याल अशी आशा आहे.

आपले,

**आनंद काटीकर** (कार्यवाह) **प्र० ना० परांजपे** (अध्यक्ष)



अनुक्रमणिका







# चिल्लर संस्कृती

महाराष्ट्र शासनाने गेल्या आर्थिक वर्षात राज्याच्या सांस्कृतिक संवर्धनासाठी पंचवीस कोटी रुपये खर्च केल्याची बातमी वृत्तपत्रात छापून आली. याचा अर्थ असा की शासनाने सांस्कृतिक संवर्धनासाठी माणशी सुमारे अडीच रुपये खर्च केले. राज्याच्या एकूण अर्थसंकल्पीय तरतुदीच्या तुलनेत पंचवीस कोटी ही अगदीच चिल्लर रक्कम आहे. संस्कृती ही अगदी चिल्लर बाब आहे असे शासनाला वाटत असावे असा याचा अर्थ होतो. संस्कृतीची चिंता करणारे लोक संख्येने अगदीच चिल्लर आहेत असेही कदाचित शासनाला वाटत असावे. त्या चिल्लर लोकांवर २५/३० कोटींसारखी चिल्लर रक्कम खर्च केली की त्यांची तोंडे बंद होतील असाही शासनाचा समज असावा. साहित्यिक, नाटकवाले, सिनेमावाले यांना काही लाखांची पारितोषिके दिली, वृद्ध कलावंतांना पेन्शन दिली, काही पुस्तके छापली की झाले सांस्कृतिक संवर्धन! अनुदानांवर अवलंबून असलेली माणसे, अनुदानांकडे आशाळभूतपणे डोळे लावून बसलेल्या संस्था, यांनी गजबजलेली ही संस्कृती चिल्लर लोकांची संस्कृती आहे असे म्हणायला काहीच हरकत नाही.

मे महिन्यात पार पडलेल्या लोकसभा निवडणुकीपूर्वी महाराष्ट्र शासनाला आपले सांस्कृतिक धोरण जाहीर करायचे होते असे ऐकले होते. त्यासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने काही बैठकाही घेतल्या असेही कानावर आले होते. पण आचारसंहितेचा अडथळा आला आणि धोरणाची घोषणा स्थगित झाली असे सांगितले जाते. आता येत्या एकदोन महिन्यांत विधानसभेच्या निवडणुकींची आचारसंहिता लागू होईल. त्यानंतर घोषणेला मिळाला तर मुहूर्त मिळेल. चिल्लर लोकांच्या संस्कृतीची काय एवढी मातब्बरी !

संस्कृती म्हणजे काय याबद्दलच्या आपल्या कल्पना अस्पष्ट, गोंधळलेल्या आहेत हे या उदासीनतेचे एक कारण असू शकेल. इंग्रजीमध्ये 'सिव्हिलायझेशन' व 'कल्चर' असे दोन शब्द आहेत. मराठीत (आणि कदाचित अन्य भारतीय भाषांत) मात्र 'संस्कृती' हा एकच शब्द आहे. यावर तोडगा म्हणून हिंदीने (आणि सोयीचे असेल

तेव्हा तिचे अनुकरण करणाऱ्या मराठीने) 'सभ्यता' असा एक शब्द तयार केला आहे : 'सिव्हिलायझेशन' म्हणजे सभ्यता आणि 'कल्चर' म्हणजे संस्कृती ! 'सिव्हिलायझेशन' व 'कल्चर' यांच्यातील फरक रवीन्द्रनाथ ठाकुरांनी चीनमध्ये केलेल्या एका भाषणात स्पष्ट केला होता. सिव्हिलायझेशन किंवा सभ्यता म्हणजे आपण **कसे** जगतो ते; आणि कल्चर किंवा संस्कृती म्हणजे आपण **कशासाठी** जगतो ते ! माणसाने कशासाठी जगावे याचा विसर पडलेली माणसे आपण कसे जगतो यालाच महत्त्व देतात. मग ते त्यासाठी जास्तीत जास्त अर्थार्जन करण्याच्या, भौतिक सुखसाधने संपादन करण्याच्या मागे लागतात; आणि जितके अधिक साध्य होईल तितके आपण अधिक 'सुसंस्कृत' झालो असे समजतात. खरे पाहता ही माणसे सांस्कृतिक दृष्ट्या चिल्लर असतात आणि ते जिला संस्कृती समजतात ती संस्कृती (किंवा खरे म्हणजे सभ्यता) चिल्लर असते.

शोध घेण्याची इच्छा, कल्पनाशक्ती, स्वातंत्र्याची जपणूक ही माणूसपणाची खरी लक्षणे. आहार, निद्रा, भय आणि मैथुन या प्राथमिक गरजा पशूंनाही असतात. पण शोध, स्वातंत्र्य व कल्पनाशक्ती या गोष्टी फक्त मानवाकडेच असतात. या मानवी वैशिष्ट्यांचा आविष्कार म्हणजे संस्कृती. भाषा, धर्म, तत्त्वज्ञान, नीती, संगीत, नृत्य, नाटक, चित्रपट, चित्र, शिल्प, स्थापत्य अशा अनेक क्षेत्रांतून माणसाची सांस्कृतिक आच, ऊर्जा, कल्पनाशक्ती व्यक्त होत असते. या आविष्काराला मोकळे व निर्भय अवकाश उपलब्ध करून देणे हे शासनाचे कर्तव्य असते; तेच त्याचे सांस्कृतिक धोरण असायला हवे!

शिक्षण हा संस्कृतीचा पाया असतो; पण शिक्षण हे खऱ्या अर्थाने 'शिक्षण' असेल तरच. पण पैसा व सत्ता यांच्या विळख्यात सापडल्यामुळे आज शिक्षणाचेही चिल्लरीकरण झाले आहे. शिक्षण म्हणजे शाळा-महाविद्यालये, खासगी वर्ग, परीक्षा असे समीकरण झाले आहे असे आपल्या अनुभवास येते. स्वातंत्र्यप्रेम, परमतसहिष्णुता, कोणतेही निर्णय हिंसेने नव्हे; तर चर्चेने घेण्याचा आग्रह, व्यक्तिमत्त्व-विकास, बौद्धिक क्षितिजाचा विस्तार ही शिक्षणाची अंतिम उद्दिष्टे असायला हवीत. पण त्याऐवजी व्यक्तिद्वेष, असहिष्णुता,तोंडाला काळे फासणे, तोडफोड, जाळपोळ याच गोष्टी वाढत आहेत. चिल्लर शिक्षण, चिल्लर नेते आणि चिल्लर संस्कृती यांचेच प्राबल्य वाढत आहे. कुणाच्या भावना दुखावल्या जातील की का या या भयाने लेखक, नाटककार, नट, चित्रपट-निर्माते व दिग्दर्शक ग्रस्त आहेत. या सगळ्या गोष्टींविरुद्ध ठामपणे उभे राहण्याचे धैर्य कुणाकडे आहे असे दिसत नाही.

दुर्दैवाची गोष्ट अशी की या गोष्टींना आळा घालण्याच्या उपाययोजना करण्याऐवजी शासनकर्ते त्यांत सहभागी होत आहेत; हल्ले करणाऱ्यांविरुद्ध बोटचेपे धोरण स्वीकारून

त्यांना अभय व पर्यायाने उत्तेजन देत आहेत.

संस्कृतीचा पाया असणाऱ्या वाचनालयांचेच उदाहरण आपण घेऊ. अनामत ठेव, वर्गणी, कोंदट व अपुरी जागा, अपुऱ्या वेतनावर काम करणारा असंतुष्ट व अकुशल सेवकवर्ग, नवीन पुस्तकांच्या भरतीची मंद गती अशा अनेक अडचणींना तोंड द्यायची तयारी असणारा माणूसच वाचनालयांकडे वळतो. याउलट प्रगत देशांतील ग्रंथालये व वाचनालये पाहा : भरपूर प्रकाशाची ऐसपैस जागा, बसण्याची उत्तम सोय, तत्पर व तरबेज सेवकवर्ग, पुस्तके-नियतकालिके-ध्वनिफिती-चित्रफिती यांची प्रचंड संख्या, त्यांत सातत्याने पडत जाणारी भर, लेखन-साहित्य, खाद्यपदार्थ इ० विकत मिळण्याची सोय, अनामत ठेव वा मासिक/वार्षिक वर्गणीचा अभाव, एकाच वेळी वीस ते चाळीस पुस्तके घरी नेण्याची मुभा - अशा वाचनालयांचा जनतेच्या सांस्कृतिक संवर्धनाला हातभार लागला नाही तरच नवल!

भरीव, आशयघन संस्कृती रुजण्यासाठी अनुकूल सामाजिक 'इन्फ्रास्ट्रक्चर'ची गरज असते. त्यासाठी भरीव निधीची व दूरदर्शी योजनाबद्ध प्रयत्नांची गरज असते. असे दूरदर्शी, योजनाबद्ध प्रयत्न करणे व त्यासाठी पंचवीस नव्हे; तर पंचवीसशे किंवा अडीच हजार कोटींची तरतूद करणे हेच शासनाचे सांस्कृतिक धोरण असायला हवे. चिल्लर निधी आणि चिल्लर प्रयत्न यांतून वाढत जाते ती चिल्लर संस्कृती!

■

**प्रा० प्र० ना० परांजपे**

**प्रवृत्ती आणि अस्तिमा**

मराठी माणूसच मराठी माणसाचा शत्रू आहे! या विधानाला दुहीचा शाप, भाऊबंदकी असली पुरंदरेछाप ऐतिहासिक भरजरी कारणे नाहीत. तर एकुणातच मराठी प्रवृत्ती त्याला कारण आहे. ही जी प्रवृत्ती आहे, तिलाच मराठी अस्मिता म्हणायचे? जोपर्यंत आम्हाला प्रवृत्ती आणि अस्मितेतला फरक कळत नाही, तोपर्यंत आम्ही 'आवाज कुणाचा?' म्हणून केलेल्या 'राड्यालाच' आपली मराठी अस्मिता म्हणू!

संजय पवार, दै० महाराष्ट्र टाइम्स, ९ मे ०६
प्रेषक : डॉ० मिलिंद मालशे

आदरांजली

# विद्यासागर महाजन

भाषांतर-चळवळीतील एक कळकळीचे आणि कल्पक कार्यकर्ते विद्यासागर महाजन ९ जून २००९ रोजी कालवश झाले. फक्त ५३व्या वर्षीच रक्ताच्या कर्करोगाने त्यांचा बळी घेतला. राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनीत ते जर्मन भाषेचे प्राध्यापक होते. जर्मनबरोबरच स्पॅनिश भाषेतही त्यांनी प्राविण्य मिळविले होते. आणि मराठीसाठी भरीव कार्य करण्याची त्यांना आच होती. त्यामुळे जर्मन, फ्रेंच, जॅपनीज्, चायनीज्, स्पॅनिश अशा परकीय भाषांतून थेट मराठीत भाषांतरे करण्याची चळवळच त्यांनी सुरू केली. विदेशी भाषांतून थेट स्वभाषेत भाषांतरे करणारे व त्यासाठी पदरमोड करून त्रैमासिक सुरू करणारे प्राध्यापक ज्या विभागात आहेत असा परकीय भाषा विभाग असणारे पुणे विद्यापीठ हे देशातील एकमेव विद्यापीठ असावे ! नियतकालिकातील भाषांतरे पुस्तकरूपाने प्रकाशित व्हावीत, वाचनप्रयोगांच्या रूपाने लोकांपुढे यावीत यासाठीही महाजनांनी यशस्वी प्रयत्न केले. या सगळ्या कल्पनांतून जाणवते ती त्यांची मराठी भाषेच्या विकासाची आच आणि एकात्मिक सांस्कृतिक दृष्टी. त्यांच्या अकाली निधनाने भाषांतर चळवळीची मोठी हानी झाली आहे यात शंका नाही. ■

प्र० ना० परांजपे

# अठरा विश्वे

ब्रह्मानंद देशपांडे

'अमुक एका गृहस्थाच्या घरी अठरा विश्वे दारिद्र्य आहे' असा वाक्प्रचार आहे. त्यावर चर्चा होऊन अठरा गुणिले वीस (विश्वे) म्हणजे तीनशेसाठ असा अर्थ करून वर्षातले तीनशेसाठ दिवस याच्या घरी दारिद्र्यच आहे असा केला गेला. यात वीसचे विश्वे कसे झाले हे समजत नाही. वीसचे अनेकवचन लोकभाषेत विसा असे होते. ते 'तीन विसा आणि साठ सारखेच' या वाक्प्रचारात दिसते. पूर्वी वय ही विसात सांगत : 'चार विसा आन् पाच वरसा झाली.' तेव्हा 'अठरा विश्वे'तील विश्वे म्हणजे अठरा गुणिले वीस असा अर्थ करता येणार नाही.

यादव सिंघणदेव (द्वितीय) याच्या पाटण (आजचे पाटणादेवी, तालुका चाळीसगाव, जिल्हा जळगाव) येथील शिलालेखात प्रख्यात गणिती भास्कराचार्य (द्वितीय) यांचा नातू चंगदेव याच्या मठासाठी जी दाने सोईदेव निकुंभ या सामंत राजाने दिली त्यात 'ग्राहकापासी दामाचा विसोवा आसूपाठी नगरें दीव्हला' असा उल्लेख आला आहे.[१] यात 'नगर' म्हणजे व्यापाऱ्यांची पंच समिती (गिल्ड). त्यांनी प्रत्येक ग्राहकामागे (त्याने दिलेल्या मूल्यामागे) प्रत्येक आसू (एक सुवर्णनाणे) एका दामाचा विसोवा मठाला दिला. तेव्हा -

२० विसोवे = १ दाम
२४ दाम = १ आसू

हे कोष्टक दिसते. दाम आणि विसोवा यांचा उल्लेख सियडोण शिलालेखात स्पष्टपणे आला आहे.[२] या लेखात विष्णुदेवतेच्या गंध, दीप, धूप, लेप आदींसाठी विविध व्यापाऱ्यांनी जी दाने दिली त्यात-

(अ) पंचीय द्रम्म सत्क पादमेकं (ओळ ६)

(ब) आटिक्राहद्रम्मस्य पादमेकं प्रदत्तं।
एतदर्थे मासान्मासं प्रति दीयमानं
पंचिय द्रम्मैमेकं सासनं लिखितं पं द्र. १. ओळ ३७-३८

यावरून पाव दामाचे पंचीय द्रम्म नामक नाणे होते. अर्थात दामाचे २० भाग

होते. यालाच विशोपक म्हणत. याच लेखाच्या १०व्या ओळीत देवाच्या धूप, दीप आदींसाठी 'प्रतिवराहकथ विंसोपकैकं प्रतिदिनं वि[१]' दान दिल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. विंसोवक > विसोवा > विसवा हा अपभ्रंशक्रम दिसतो.

तेव्हा अठरा विसोवे (विसवे) दारिद्र्य म्हणजे नव्वद टक्के दारिद्र्य असा अर्थ सहजच ध्यानी येतो. पूर्वी लोक रुपया-आण्यांच्या मापात बोलत. आमचा एक मित्र अभिमानाने सांगत होता, 'औरंगाबादचे चौदा आणे वकील मला ओळखतात.', 'प्रकृतीत दोन आणे उतार आहे.', 'सोळा आणे काम झालं' हे तर सर्वश्रुत आहे. तसेच हे अठरा विश्वे दारिद्र्य. ■

**संदर्भ**


१. शं० गो० तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख, पृ० १०५-११३

२. EI., I, pp.162-170



'ऐतिहासिक', 14, अनुपम वसाहत, श्रेयनगर, औरंगाबाद 431 005.

दूरभाष : (0240) 2336606 चलभाष : 09923390614


### कसेही बोला; कसेही!

सध्या शुद्ध आणि अशुद्ध या संकल्पना बादच झाल्या आहेत. भाषा अशुद्ध नसतेच. पण हे तत्त्व फक्त मराठी भाषेच्या बाबतीतच मोठ्या आदराने पाळले जाते आहे. बोलणे, समजणे, संज्ञापन महत्त्वाचे. सुमारे पन्नास वर्षांपूर्वी बहुजन समाजासाठी 'जसे बोलायचे तसे लिहायचे' असे उदार धोरण अवलंबिले गेले. शुद्धलेखनाचे साधे सोपे नियम आले. आता काहीच नियम नाही. कसेही बोला. कसेही लिहा. शंभरातल्या एकशेपाच जणांना प्रमाण मराठी बोलता येत नाही. शिकवणाऱ्यांनाही नाही. ठीक आहे. कोणती, कोणाची प्रमाण मराठी? आम्हाला ती बोलायचीच नाही. आम्ही आमच्या भाषेत बोलणार. आमच्या भाषेत शिकवणार. तुम्ही ज्या 'शुद्ध' मराठीची गोष्ट सांगताय, ती मुळी आम्ही नाकारतोच आहो. 'शुद्ध' 'शुद्ध' म्हणतात ती मराठी आहे कुठे? काही वर्तमानपत्रवाले ती वापरतात. आम्ही ती वाचतो म्हणजे तिच्यावरून नजर फिरवतो. अर्थबोध झाला की झाले! आता भाषा ही मुळी लिहिण्यासाठी नाहीय. ती एकाचे बोलणे दुसऱ्याला कळणे एवढ्यापुरतीच शिल्लक आहे आणि तेवढे पुरे आहे. शिवाय इथे लिहायचे आहे कोणाला? आणि मराठी? ते तर नाहीच नाही.

प्रभा गणोरकर, दै० सकाळ, ३१-०५-०९

# देवाची भाषा

द० भि० कुलकर्णी

भाषा ही अद्‌भुत शक्ती आहे. भाषेची देवता अंभृणी.

तिनं म्हटलंय, ''यं कामये तं तमुग्रं कृणोमि-।'' माझ्या उपासकाला मी शक्तिमान, प्रज्ञावान, ब्रह्मरूप करते.

भाषेकडे लक्ष देणारा समाज कसा होत जाईल, कळलं? आणि आज आपला समाज क्षीण, मूढ व आत्मकेंद्रित का होतोय हेही कळलं?

जगातील चराचर वस्तूंना त्यांची त्यांची भाषा असते; निर्जीव वस्तू झिजण्यातून आपल्याशी बोलत असतात; सजीव वाढीतून आपल्याशी बोलत असतात; जिवंतपणाचं लक्षण वाढणे-जखमा भरून येणे - आत्मप्रतिमा निर्माण करणे. लाकूड निर्जीव; पण वृक्ष सजीव. पशु-पक्षी-कीटक उत्क्रांतीच्या आणखी वरच्या टप्प्यावर : काही पशू नादभाषा वापरतात; काही पशु-पक्षी नादभाषा-रंगभाषा वापरतात; काही पशु-पक्षी-कीटक नादभाषा-रंगभाषा-स्पर्शभाषा वापरतात - वर गंधभाषाही वापरतात.

त्यांच्या जगण्याला तेवढी भाषारूपे पुरेशी असतात.

मानवही प्रारंभकाळी अशीच भाषा वापरीत असणार; पण जसजसे त्याचे जीवन व्यामिश्र होत गेले तसतसे भाषेचे हे स्थूल रूप त्याला अपुरे वाटायला लागले असणार. हे पाहा, चोर घरात घुसला तर कुत्रा त्वेषाने भुंकणार, चोराला हुसकावून लावणार; संध्याकाळी मालक घरी आल्यावर हर्षाने त्याच्याभोवती घोटाळणार, हुंदडणार; पण तो खंडोबा हे काही सांगू शकणार नाही, की ''मी दुपारी चोराला पिटाळून लावले.'' ''का? जे चाकराला जमते ते कुत्र्याला का जमत नाही?''

- कारण मानवेतरांची भाषा निसर्गसिद्ध भाषा आहे; मानवाची भाषा प्रयत्नसिद्ध संकेतयुक्त आहे. 'झाड' हा शब्द आणि 'झाड' ही वस्तू यांचा अर्थाअर्थी काहीच संबंध नाही; असंख्य वस्तूंना बाजूला सारून (अपोह) एका विशिष्ट वस्तूला आपण 'झाड' असे नाव दिले; ते लक्षात ठेवले; झाड ही वस्तू आणि 'झाड' हा शब्द यांच्यांत तादात्म्य कल्पिले - मानवेतर असे संकेत निर्माण करतील? ज्या मानवांना असे संकेत

निर्माण करता येत नाहीत त्यांना काय म्हणावे? वस्तु-शब्द यांच्या तादात्म्याला जे महत्त्व देतात ते म्हणतात, ''इतरेतराध्यासाचे स्मृतिरूप तादात्म्य' या प्रक्रियेतून संकेत निर्माण होतात; जे अपसारणाला महत्त्व देतात ते स्वत:ला म्हणवितात 'अपोहवादी'. 'ऊहापोह' हा शब्द आपल्याला ज्ञात आहेच. त्यासाठी नागेशभट्ट, नागार्जुनाचार्य आणि सोस्यूर यांच्याकडे जायला नको; आपण आपले साधे ऊहापोहवादी. आपली मायबोलीच आपल्याला लहानपासून ऊहापोहवादी करीत असते.

अशा अगणित संकेतांनी बोली, भाषा, परिभाषा घडत असतात, वाढत असतात. अन्य भाषांपासून, विविध शास्त्रांपासून आपण असंख्य शब्द घ्यावेत - घेतोच; पथ्य एकच पाळायचे : त्यांना आपण आपल्या भाषेत जरा भिन्न संकेतछटा द्यायची - देतोच : वैद्य-डॉक्टर, मेज-टेबल, पोथी-पुस्तक. आपल्या शब्दांना हुसकावून नवीन शब्द आले की ती चोरी; आपल्या शब्दांच्या शेजारी नव्या संकेतछटांचे शब्द आले की ती समृद्धी.

समाज भाषेला व भाषा समाजाला, असे ते एकमेकांना घडवीत असतात. भावना-विचार-अनुभव यांचे प्रकटीकरण तर भाषा करतेच, शिवाय या साऱ्याची साठवण, निर्मिती, पुनर्निर्मिती, वहन हे सारेही ती साधत असते. एवढेच काय, कवीची अनुभूतीच भाषांकित असते.

भाषा इतकी तोलामोलाची आहे - विशेषत: मातृभाषा. मातृभाषा आपल्या अस्तित्वाच्या केंद्रस्थानी असते. तीच आपल्याला 'असण्या'कडून (बीइंग) 'होण्या'कडे (बिकमिंग) नेत असते. भाषा - विशेषत: मातृभाषा - आपण गमावून बसलो तर आपलं माणूसपणच संपून जाईल; आपण रोबोरूप होऊन जाऊ. चालेल? यंत्रसंस्कृतीनं आपलं काय घोडं मारलंय? या यंत्रांमुळे आपलं गाढव होऊ नये - एवढंच : यंत्राचा भस्मासुर होऊन त्याने मानवाच्या मस्तकावर पंजा पसरू नये - एवढंच.

भाषा मानवाला शक्तिमान, प्रज्ञावान होण्यास साह्य करीत असते. भाषेमुळे संस्कृतीत सातत्य आणि विकसनक्षमता येते. बिंब तरी बचकेएवढें । परी प्रकाशा त्रैलोक्य थोकडें । शब्दाची व्याप्ती तेणेंपाडें । जाणावी हे ॥ सुगरण नर फार सुबक घरटं विणतो; पण त्याच्या पुढच्या पुढच्या पिढ्या त्यात बदल-सुधारणा नाही करू शकत; आणि मानव? प्राचीन गुहागृहे, मध्ययुगीन पाषाणीमहाल, अर्वाचीन काँक्रीटची जंगले. आणखी बरेच काही. सांस्कृतिक सातत्य ते हे. भाषा-परिभाषा यांच्याशिवाय हे सारे घडले असते? संकेतयुक्त भाषेशिवाय? मग काय झाले असते? अहो, काहीच झाले नसते : नर वानरच राहिला असता. नराचा यंत्रनर होण्यापेक्षाही नर वानर राहणे केव्हाही





अनुक्रमणिका

त्याज्यच.

अचेतनांची झिजकी भाषा.

सचेतनांची उचकी भाषा.

मानवांची मनकी भाषा.

- आणि देवाची?

परमेश्वर म्हणा, ब्रह्म म्हणा, अंतिम सत्ता म्हणा - तिची भाषा? शब्द विशिष्ट वस्तूला इतर वस्तूंपासून विलग करीत असतो. अंतिम तत्त्व जर सर्वव्यापी असेल तर त्याला विलग करणारच कसे? आपली बोलती बंद. आपलीच का, ऋषिमुनींचीही : यतो वाचो निवर्तन्ते, अप्राप्य मनसासह । मानवी भाषेत देवाशी बोलताच येत नाही. तिथे वाणीचा हुरडा, मनाचा मोगरा काय कामाचा? मनू हा मोगरा । अर्पुनि ईश्वरा । पुनरपि संसारा । येणें नाही ॥ आपल्यासारखा गणपत वाणी असे उद्‌गार काढील?

वाणीची शक्ती आणि वाणीची मर्यादा कळली की भाषा किती कोवळिकीने हाताळायची असते ते कळते. पारमार्थिक अनुभूती यायला आपणांपाशी प्रज्ञा आणि विद्या यांच्यापेक्षा अंत:करणाची कोमलता आणि विमलता असावी लागते. त्याविना देवाची मौनाची भाषा ऐकूच येत नाही. ती मौनाची मोहनवीणा ऐकली की 'श्रुतीसि श्रवण निघाले' अशी प्रचीती येते. तशी प्रचीती येत नाही तोपर्यंत 'हे सारे मिथ्या आहे' असे म्हणायला काहीच हरकत नाही! तशी प्रचीती येते तेव्हा ती प्रचीतीच आपली आधारकाठी होते - म्हातारपणची नव्हे, 'बिकमिंग'ची. तेव्हा स्वार्थ, स्वकेंद्रितता भेदून अशा व्यक्तीची जाणीव उन्नत झालेली असते - वानर आणि नर यांच्या संज्ञेत जितका कोटिभेद असतो तितकाच कोटिभेद नर आणि सुनर यांच्या संज्ञेत असतो. हे समजत नाहीये की पटत नाहीये?

देवाच्या काठीला घुंगरं नसतात, असं म्हणतात. असतात हो, पण ती मुकी असतात. देवाची भाषा या अर्थानेही मौनाची भाषा असते. आपल्याला ती घुंगरं ऐकू येत नाहीत; पण काठी तर ऐकू येते - पाठीत बसल्यावर; पण ती देवाची लिपी असते, भाषा नव्हे. कळेल.

■

'वसुधा', ई-004, डीएसके विश्व ऑफ सिंहगड रोड, धायरी, पुणे 411 041.

दूरभाष : (020) 2438 0894



अनुक्रमणिका

# ‘फजी’ शब्दार्थ

सदाशिव देव

मराठी भाषाविज्ञानात शब्दनिर्मिती, शब्दकुळे, शब्दमुळे, शब्दभेद अशा संकल्पना साहित्यिकांनी विविधप्रकारे फुलवल्या आहेत. ज्ञानेश्वर महाराजांनी ‘जरी बिंब बचके एवढे’ असे शब्दसृष्टीचे केलेले वर्णन, तुकाराम महाराजांनी शब्दांना दिलेली ‘कल्पांताचे बीज’ ही उपमा तर स्वामी रामदासांनी ‘शब्दभेद, अर्थभेद। मुद्राभेद प्रबंधभेद। नाना शब्दांचे शब्दभेद’ असे केलेले वर्णन यांतून सर्व संत मंडळी भाषावैज्ञानिकच होती असे वाटणे अगदी स्वाभाविक आहे.

या लेखात शब्दांना लाभलेले सौंदर्य व त्यांच्या अर्थाला झालेला ‘गणितीय स्पर्श’ यासंबंधी थोडक्यात चर्चा करण्याचे योजले आहे. अनेक जाणकारांना याविषयी माहिती आहेच. येथे फक्त या शब्दार्थाकडे पाहण्यासाठी एक वेगळी वाट चोखाळली आहे. या विषयाची सुरुवात एक उदाहरण देऊन करतो.

**दारिद्र्य रेषा**

आमच्या गावात गरीब समाजातील दोन भाऊ रामा आणि शिवा राहतात. दोघेही नोकरी करतात. यांपैकी मोठ्या भावाचे, रामाचे, उत्पन्न ५०,००१ रु० तर धाकट्याचे, शिवाचे, वार्षिक उत्पन्न ४९,९९९ रु० आहे. सरकारने आता दारिद्र्य-रेषा रु० ५०,००० मान्य केली आहे. त्यामुळे यांपैकी मोठा भाऊ दारिद्र्यरेषेच्या वर तर धाकटा भाऊ या रेषेखाली येतो. धाकट्या भावाच्या या सामाजिक दर्जामुळे त्याला घर बांधण्यासाठी लहान का होईना फुकट प्लॉट मिळाला. बँकेचे त्यासाठी कमी व्याजाचे कर्ज मिळाले. दोन्ही मुलांना शिक्षणासाठी फी-सवलत, पुस्तके विकत घेण्यासाठी मदत मिळाली. नगरपालिकेने पाणी, वीज सवलतीच्या दरात पुरवली. अशा प्रकारच्या सवलती मोठ्या भावाला मिळणे शक्य नव्हते. या वस्तुस्थितीमुळे दोन्ही भावांच्या कुटुंबात द्वेष, मत्सर अनुभवास येत असे.

वास्तविक दोन्ही कुटुंबांच्या वार्षिक उत्पन्नात केवळ दोन रुपयांचा फरक होता. व्यवहाराच्या दृष्टिकोणातून दोन्ही कुटुंबांचे उत्पन्न सारखेच आहे असे मानायला काहीच हरकत नाही. गणिताच्या भाषेत -

उत्पन्न (रामा) = उत्पन्न (शिवा) असे सूत्र मांडता येईल. शेजारी कुटुंबातील माधवचे वार्षिक उत्पन्न ५०,००३ रु० (२ रु० जास्त) असेल तर उत्पन्न (रामा) = उत्पन्न (माधव) हे सूत्रही ठीक वाटते. गावातील अन्य १०,००० नागरिकांचे उत्पन्न असेच प्रत्येकी दोन रुपयांनी जास्त असेल तर

उत्पन्न (शिवा) = उत्पन्न (रामा) = उत्पन्न (माधव) = ...

= उत्पन्न (१०,००० क्रमांकावरील व्यक्ती) असे गणिताच्या नियमानुसार लिहावे लागेल. पण वर दिलेले सूत्र कोणीही मान्य करणार नाही. म्हणजेच

उत्पन्न (शिवा) ≠ उत्पन्न (१०,००० क्रमांकावरील व्यक्ती). (येथे ≠ हे चिन्ह असमान (नॉट इक्वल टु) या अर्थाने योजले आहे).

'क्रीमी लेयर'संबंधी सुप्रीम कोर्टाने दिलेल्या निर्णयाबद्दल अशीच संदिग्धता निर्माण होणार आहे. येथे 'दारिद्र्यरेषा' या शब्दाचा अर्थ संदिग्ध आहे हे सहजपणाने लक्षात येते. वर दिलेले उदाहरण वरवर कृत्रिम वाटेल. पण या गटातील लोकांशी संपर्क आला की प्रत्यक्षात असे होत असल्याचे लक्षात येते.

आपण रोज जी भाषा वापरतो तिच्यातील अनेक शब्द असेच संदिग्ध अर्थबोध करणारे असतात, असे सहज लक्षात येईल. यांपैकी काही शब्द शब्दकोशात अर्थासह दिलेले असतात. त्यांतही अशीच अस्पष्टता असते असे लक्षात येते. अशा शब्दांची संख्या तर्शी फार मोठी असते हे पण सहज सुचवता येईल. खोल, उंच, गोड, कडू, टणक, मऊ, धीट, रागीट, उपरा, सज्जन, दुर्जन, गरीब, श्रीमंत, भित्रा, गंभीर, वाईट, चांगला, सभ्य, असभ्य... अशा हजारो शब्दांची यादी येथे देता येईल. त्यांचे अर्थ आपण अंदाजाने स्वीकारतो. या शब्दांच्या अर्थाची अस्पष्टता, अ-पूर्णता आपल्याला उमजते व ती आपण सहजपणे स्वीकारतो. या शब्दांची संवादात चिकित्सा केली तर मग हा माणूस 'समजूतदार' नाही असेही मानले जाते. थोडक्यात एकच भाषा बोलणारे लोक अशा शब्दांचा अर्थ त्यांना रुचेल, परवडेल, झेपेल तसा स्वीकारतात. परिणामी अनेकवेळा संज्ञापनात विविधता तर काहीवेळा मतांतरे झालेली आढळतात. जीवनात घडणाऱ्या प्रत्येक घटनेत भाषेचे अस्तित्व केंद्रस्थानी असते. पण भाषेतील संदिग्धतेमुळे शब्दार्थांचे अपेक्षित असलेले एकत्व मात्र अनुभवास येत नाही. एकाच कुटुंबातील अगर मित्रपरिवारातील घटकांना एकमेकांचे स्वभाव माहीत असल्यामुळे भाषेतील संदिग्धता कमी प्रमाणात जाणवते.

जगातील सर्वच शब्दकोशांतून अशी संदिग्धता समाविष्ट असते. ती केवळ मराठी भाषेत आहे असे नव्हे. आपली भाषा संदिग्धतेमुळे अपरिपक्व आहे असे कोणी म्हटले तर ते कोणत्याही भाषकाला आवडणार नाही. मग अशा अनेक शब्दांनी युक्त असणारी

भाषा अपरिपक्व समजायची की ती भाषेची शक्ती किंवा गुणवत्ता समजायची असा विकल्प मनात येऊ शकतो.

साधारणपणे जी माणसे समपातळीवर जीवन जगतात, एकाच सांस्कृतिक वातावरणात व्यवहार करतात त्यांना भाषार्थातील संदिग्धता इतकी क्लेशदायक वाटत नाही. 'माझा मित्र गप्पिष्ट आहे', 'तू आता दमला असशील', 'आजचा संगीत कार्यक्रम रंगला', 'हा विद्यार्थी हुषार आहे', 'ती मुलगी देखणी आहे; पण मंद आहे', अशी वाक्ये व्याकरणदृष्ट्या अर्थवाही आणि बिनचूक आहेत. ती काहीशी संदिग्ध आहेत हेही ठीक आहे. समान विचारसरणीत वाढलेली माणसे अशी संदिग्धता सोसू शकतात आणि गरज नसेल तर मतभेदही व्यक्त करीत नाहीत. अशी अस्पष्टता व्यावहारिक पातळीवर शून्य आहे असे ते मानतात. त्यांच्यातील हा सोशिकपणा ते काही वेळा औदार्याच्या पातळीवर नेऊन ठेवतात. भाषेतील अस्पष्टपणा व्यवहारी माणसे भाषेचे एक वैभवचिन्हच आहे असे समजतात.

पण अशी भाषा मात्र वैज्ञानिक स्वरूपाच्या संज्ञापनासाठी मात्र अपुरी ठरते. ती अशा वेळी टाळणेच युक्त होईल. संज्ञापनातील शब्दांना एकास एक अर्थ असेल तरच ते संज्ञापन स्पष्ट आणि रेखीव संकेत व्यक्त करू शकते. व्यावहारिक पातळीवर संज्ञापन अस्पष्ट वाटले तर एखादा उपप्रश्न विचारून ते अर्थपूर्ण करता येते. पण विज्ञानस्वरूप क्षेत्रभाषा प्रकारात प्रत्येक शब्द एकच अर्थ सूचित करतो. तसेच एखादा व्यवहार कृतिशील होण्यासाठी, सफल करण्यासाठी भाषासंज्ञापन स्पष्ट असावे लागते. यासाठी शब्दाला लाभलेला गणितीय, रेखीव, स्पष्ट अर्थच अखेरीला संज्ञापनात आवश्यक ठरतो. उदाहरणार्थ, 'आज मुलाला ताप आला आहे' असे संज्ञापन उपप्रश्न विचारल्याशिवाय पूर्ण होत नाही; पण 'आज मुलाला १०२° ताप आहे' हे संज्ञापन नेमका संकेत देऊन जाते. अखेरीला भाषा समृद्ध होण्यासाठी अशी गणितीय स्वरूपाची भाषा क्रमाने वाढत राहावी लागेल. अर्थात अशा भाषाप्रकाराला मर्यादा असणारच उदा० 'श्रीखंड गोड आहे' या वाक्यात गोड शब्द अस्पष्ट संकेत व्यक्त करतो. मिश्रित साखरेच्या प्रमाणात आपण प्रयोग करून गोडीचे स्तर $गोड_{(१)}$, $गोड_{(२)}$,... $गोड_{(१०)}$ असे नियोजित करू शकू व वरील संज्ञापन 'श्रीखंड $गोड_{(८)}$ आहे' असे करू शकू. या वाक्यात आता अस्पष्टता कमी झाली आहे. पण हा संकेत समजण्यासाठी ऐकणाऱ्याला गोडीचे हे स्तर लक्षात हवेत. एवढ्याने भागत नाही. 'गोड' हा शब्द वस्तू नाही. त्याला रंग, रूप, आकार, वजन नाही. गोडीचा गुणधर्म फक्त जिभेला समजतो. ही चव व्यक्तिगणिक, प्रसंगानुरूप, वयानुसार बदलते. तेव्हा गोडीच्या इतक्या व्याख्या हव्यातच कशाला? प्रत्येक संदिग्ध शब्दाला असे स्तर उपयोजित करणे म्हणजे भाषा या

संज्ञापनाच्या सोप्या साधनावर अन्याय ठरेल. शब्दसंस्थेचे संरक्षण करणाऱ्या पाणिनीला भाषेत भासणारी ही संदिग्धता नक्कीच लक्षात आली असावी म्हणूनच या असामान्य वैयाकरणीने शब्दकोश रचनेत अर्थभेद 'समजून घ्या' असे सुचविले असावे. एकूण काय, भाषा जास्तीत जास्त नेमकी आणि अर्थवाही करण्यात भाषेला प्रगत केली असे वर वर वाटत असले तरी या यशातच तिच्या अपयशाची बिजे आहेत.

वर केलेले विवेचन सर्वांनाच मान्य असते. त्यात वेगळे काय आहे, असा विचार वाचकांच्या मनात येईल. एका बाजूने मी कोलमडलेल्या गणिताचे उदाहरण दिले आहे. हे खरे आहे. पण मला येथे उलटपक्षी गणित 'शास्त्र' या संदिग्धतेला कसे उपायकारक होणार आहे ते सांगायचे आहे.

थोर शास्त्रज्ञ आणि विचारवंत अल्बर्ट आइन्स्टाइन एका व्याख्यानात म्हणाले की- ''वस्तुस्थितीचा निर्देश करण्याच्या बाबतीत गणिताचे नियम नेमके नसतात. मात्र ते ज्या प्रमाणात नेमके असतील त्या प्रमाणात ते वस्तुस्थितीला निर्देश करीत नाहीत.''* थोडक्यात, गणितात अनुभवास येणारा (अति) नेमकेपणा, तंतोतंत बरोबरपणा (सामान्य भाषेत आडमुठेपणा) रोजच्या घटनांना न सोसणारा असतो. पण जर गणितातील नियम सैल झाले, उदार झाले तर मात्र ते व्यावहारिक घटनांना खूप उपयोगी ठरू शकतात.

वर नोंदलेल्या वचनाचा पडताळा मला गणितशास्त्राने घेतलेल्या नवीन भूमिकेत अनुभवास येत आहे. गणित विषय प्रगतीच्या टप्प्यात तेवढा आडमुठा राहिलेला नाही. नवीनच प्रगत होणाऱ्या या गणितीय ज्ञानशाखेला 'फजी मॅथेमॅटिक्स' (Fuzzy Mathematics) म्हणतात. या शास्त्राच्या उपशाखा फजी लॉजिक, फजी फिजिक्स, फजी इंजिनिअरिंग, फजी टेक्नॉलॉजी अशा विविध दिशांनी विस्तारताना दिसतात. केवळ सोयीसाठी या ज्ञानशाखेचा विषय नोंदतो व नंतर भाषेच्या प्रश्नाकडे वळू.

हा नवीन विषय गणितात आज अस्तित्वात असलेल्या 'संभाव्यता-शास्त्र' (Probability Theory) यापेक्षा वेगळा आहे. त्याची उपयुक्तता तंत्रज्ञान क्षेत्रात जपान देशात यशस्वीपणे सिद्ध झाली आहे. हा विषय आता भाषाविज्ञानातही उपयोजित होत आहे. भाषाविज्ञानाला आता तंत्रज्ञानाची वाढती गरज भासू लागली आहे. गणितशास्त्र आणि संगणकशास्त्र यांचा वाढता उपयोग भाषाभ्यासासाठी होत आहे. जागतिक कीर्तीचे भाषावैज्ञानिक प्रा० नोम चॉम्स्की अमेरिकेतील एम०आय०टी० या उच्च तंत्रज्ञान विद्यापीठात प्राध्यापक आहेत. भारतातील आय०आय०टी० संस्थांनी

---

* 'As far as laws of mathematics refer to reality they are not certain. However, as far as they are certain, they do not refer to reality.'

भाषाविज्ञान विभाग सुरू केले आहेत. ही गणितीय शाखा भाषेतील संदिग्धता-स्थितीवर बराच प्रकाश टाकेल असे दिसते. आज उपयोगात असणारे शब्दकोश कालांतराने 'पहिल्या पिढीचे कोश' होतील व 'येणाऱ्या पिढीतील शब्दकोश' या गणितीय तत्त्वांच्या आधारावर बेतले जातील, असे वाटते. ■

12, प्रेसी बिल्डिंग, मळा, पणजी, (गोवा) 403 001. भ्रमणभाष : 098811 58225

## नृपनीती

दोन वर्षांपूर्वी भारतीय वन्यजीव संस्थेमार्फत वाघांची शिरणागती करण्यात आली. खूप काळजीपूर्वक. तेव्हा एक मार्गदर्शक पुस्तिका बनवली, प्रत्यक्षात पाहणी करणाऱ्या वनरक्षक व त्यांच्या हाताखालच्या मजुरांसाठी. तिची सुरुवातच होते, 'दि. १२-१४ जानेवारी २००४ला कान्हा येथे कार्यशाळा व 'बुद्धी-वावटळ' सत्र संपन्न झाले'इथपासून.'बुद्धी-वावटळ'आहे, इंग्रजी 'ब्रेन-स्टॉर्मिंग'चे निर्बुद्ध भाषांतर. इथूनच बिचाऱ्या वनरक्षकांची डोकी गरगरायला लागतील! पुस्तिकेचे नाव आहे, 'वाघ, सह-शिकारी प्राणी-भक्ष व त्यांच्या प्राकृतिक अधिवासाच्या सातत्याची पडताळणी'. मी म्हटले असते, 'वाघ, इतर हिंस्र पशू, त्यांचे भक्ष्य व वसतिस्थाने यांची पाहणी करण्याची पद्धती.' एक मथळा आहे, 'खुरे असलेल्या धावणाऱ्या प्राण्यांचे ओळख चिन्हे दिसण्याच्या सातत्यावरून प्रगणना प्रारूप.' साध्या मराठीत म्हणू, 'हरीण-गव्यांसारख्या पशूंच्या खाणाखुणांची पाहणी.' तसेच, 'वनस्पती, मानवनिर्मित प्राकृतिकवास बिघाडामुळे झालेले नुकसान व खुरे असलेल्या धावणाऱ्या प्राण्यांचे विष्ठा-प्रगणना प्रारूप.' माझ्या मायबोलीतले मोजके शब्द आहेत, 'वनस्पती, माणसाचा वावर व शेण-लेंड्यांची पाहणी.'

सोप्या मराठीत आपण हे सगळे विषय सहज समजावून देऊ शकतो. केवळ नाइलाजाने सरकारला कठीण भाषा वापरावी लागते आहे, असे अजिबातच नाही. छे, छे, उलट संशय येतो, की खडूसपणे लोकांना जास्त काही उमजू नये म्हणून हा डाव रचलेला आहे. ही नृपनीती काही नवी नाही. कौटिलीय अर्थशास्त्रासारख्या ताओ-ते चिंग या चिनी ग्रंथात स्पष्टच म्हटले आहे, 'पहिल्यापासूनच सन्मार्गाने जाणाऱ्या शहाण्यांनी जनतेला केव्हाच ज्ञान पुरवले नाही. उलट लोकांना गोंधळात पाडण्यासाठीच त्यांनी स्वतःच ज्ञान वापरले. फार जाण असलेल्या लोकांवर राज्य करणे अवघड असते. म्हणूनच ज्ञानाच्या आधारावर राज्य चालवायला पाहिले तर शासननौका डुगमुगायला लागते. उलट अज्ञानाधारे चालवलेल्या राज्याला स्थैर्य लाभते.'

- माधव गाडगीळ, दै० सकाळ, पुणे. दि० १ मे २००९



अनुक्रमणिका

# आनंद यादव यांचा बोली-भाषा-विचार

रत्नाकर बापूराव मंचरकर

## उत्तरार्ध

**बोलींचा वाङ्मयीन प्रवास**

ग्रामीण बोली मराठीच्या ग्रांथिक व्यवहारात केव्हा व कोणत्या प्रकाराने वापरली गेली; तिची वळणे-वाकणे, तिचे टप्पे यांचा एक ऐतिहासिक आलेख काढण्याचा आनंद यादव यांनी प्रयत्न केला आहे. असे करताना बदलती सामाजिक परिस्थिती आणि त्या त्या वेळचे वाङ्मयीन वातावरण या दोन्हींचा संदर्भ जागता ठेवला आहे.

महात्मा जोतिबा फुले (इ०स० १८२७ ते १८९०) यांच्या ग्रंथाचे परीक्षण करण्याच्या निमित्ताने विष्णुशास्त्री चिपळूणकर (इ०स० १८५० ते १८८२) यांनी इ०स० १८७७मध्ये फुल्यांच्या विचारविश्वावर आणि ग्रंथभाषेवर टीकेची झोड उठविली. फुले यांच्या भाषेवर इंग्रजीचा व मिशनरी मराठीचा काही प्रभाव असला तरी मूलत: ती ब्राह्मणेतरांची, बहुजनांची व ग्रामीणांची भाषा होती. बहुजनांच्या देशी बोलीने ग्रंथरूप धारण करताच ग्रंथगत प्रमाणभाषेच्या क्षेत्रातून तिच्यावर झालेला हा पहिला हल्ला मानावा लागतो. अभिजनसंस्कृती आणि बहुजनसंस्कृती, ब्राह्मणी आणि अब्राह्मणी, शुद्धतावादी आणि तथाकथित अशुद्ध बोलणारे यांच्यामधला हा संग्राम असल्याचे दिसते. प्रमाणभाषेच्या अभिजनांनी ग्रामीण भाषेविषयी दाखविलेला पूर्ण अविश्वास त्यांच्या या विरोधी वृत्तीतून स्पष्ट जाणवतो. हा मुद्दा मांडताना म० फुले व वि० कृ० चिपळूणकर यांच्या व्यक्तिमत्त्वातील विरोध, त्यांच्या भाषिक घडणीचा काळ, त्यांच्याभोवतालची सामाजिक, वाङ्मयीन व सांस्कृतिक परिस्थिती या सर्वांची सूक्ष्म व चिकित्सक मीमांसा यादवांनी केलेली आहे ती मोठी उद्बोधक आहे. प्रमाण मराठीची घडण होताना अशा काही चुका झाल्या की प्रमाण भाषा व मराठी बोली यांच्यात एक मानसिक दरी निर्माण झाली; इकडेही त्यांनी लक्ष वेधले आहे. (संस्कृती, ५/ पृ० ३४-३९). या सगळ्याचा परिणाम म्हणून ग्रांथिक परंपरेत बोलीला विरोध झाला. तिच्यावर अविश्वास दाखवून तिची हेटाळणी करण्यात आली. हा ग्रामीण बोलीच्या

वाङ्मयीन प्रवासाचा पहिला टप्पा म्हणावा लागतो.

हरी नारायण आपटे यांच्या ''काळ तर मोठा कठीण आला'' (इ०स० १८९७), धनुर्धारी यांच्या ''पिराजी पाटील'' (इ०स० १९०३) या साहित्यकृतींतील ग्रामीण पात्रांच्या तोंडी नागरभाषाच वापरलेली दिसते.

इ०स० १९२५ व पुढेही काही काळ नाटकातील गावंढळ विनोदी पात्रांच्या तोंडी ग्रामीण बोली वापरलेली दिसते. ग्रामीण भाग, तेथील लोक व त्यांची बोली यांचा टिंगल-टवाळीसाठी होणारा वापर हा बोलीच्या वाङ्मयीन प्रवासातील दुसरा टप्पा.

गांधीयुगात खेडे, तेथील लोक व त्यांची बोली याकडे पाहण्याचा दृष्टिकोण बदलू लागला. त्यामुळे इ०स० १९२५ नंतर कथा, कादंबरी, जानपद कविता यात ग्रामीण बोली गांभीर्याने वापरली गेल्याचे दिसते. यशवंत, गिरीश, ग०ल० ठोकळ यांची ग्रामीण बोलीकडे पाहण्याची वृत्ती तुच्छतादर्शक किंवा टवाळखोर नाही. गंभीर आहे. त्या जोडीला जानपद बोलीने कवितेच्या श्रवणीयतेला लज्जत येते, हे जाणून 'फॅशन' म्हणून ती वापरण्याची पद्धत आली. तीत अंतर्मुखतेपेक्षा बहिर्मुख उत्साह मोठा होता.

इ०स० १९२५-१९४० या तिसऱ्या टप्प्यातील लेखकांची भूमिका आपण ग्रामीण जीवन शहरी वाचकांना समजून सांगावे अशी होती. त्यासाठी त्यांनी ग्रामीण साहित्याच्या निवेदनाची भाषा नागर मराठी व पात्रांच्या तोंडची भाषा ग्रामीण बोली अशी द्विस्तरीय व्यवस्था ठेवल्याचे दिसते. (संस्कृती, ५/पृ० ३९-४०)

यात मन:पूर्वकता, सखोलता व गांभीर्य आले ते कथाकार श्री०म० माटे आणि कादंबरीकार र०वा० दिघे यांच्या लेखनात. माटे साताऱ्याकडच्या ग्रामीण भागात, पुण्या-मुंबईबाहेर वाढले. महार, मांग, रामोशी, भराडी, चांभार अशा उपेक्षित समाजघटकांशी त्यांचा जवळून परिचय होता. त्यांच्यासाठी काही काम त्यांनी दीर्घकाळ केले. समग्र मराठी समाजाविषयी त्यांनी समाजशास्त्रीय चिंतन केलेले होते. त्यामुळे त्यांच्या नागरभाषेत अनेक प्रादेशिक छटा मिसळलेल्या होत्या. मार्मिक ग्रामीण शब्द माटे निर्भीडपणाने आपल्या प्रमाणभाषेत वापरीत व त्या शैलीने लिहीत. समाजाच्या विविध क्षेत्रांत विखुरलेल्या बलुतेदारांनी, विविध जातीजमातींनी आपल्या भाषेत लिहिले तर मराठी भाषा समृद्ध होईल; अशी 'भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टी' त्यांनी मांडली. श्री०म० माटे यांची ही भूमिका विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या भूमिकेच्या नेमकी विरोधी होती.

र०वा० दिघे वकील असले तरी खेड्यात राहात. शेती करीत. थॉमस हार्डीसारखा ग्रामीण लेखक त्यांचा आवडता होता. गांधीवाद त्यांना मान्य होता. त्यांची प्रमाणभाषा ग्रामीण भाषेतील अनेक शब्दप्रयोगांनी व रचनावैशिष्ट्यांनी संस्कारित झालेली होती.

या भाषेतच त्यांनी आपल्या ग्रामीण कादंबऱ्यांचे निवेदन केले आणि संवाद खास ग्रामीण बोलीतून लिहिले.

नागर व ग्रामीण यांच्या सरमिसळीतून जी नवी प्रमाणभाषा घडू पाहात आहे; त्याचे दोन नमुने म्हणून माटे-दिघे यांच्या लेखनशैलीकडे यादव पाहतात. इ०स० १९४० ते १९६० पर्यंत या दोन मातब्बर लेखकांनी ग्रामीण जीवनाच्या विश्वस्ताची (ट्रस्टीची) महत्त्वपूर्ण भूमिका बजावली. त्यामुळे ग्रामीण साहित्य अधिक वास्तवदर्शी झाले. निवेदनातील नागर व संवादातील ग्रामीण यात जो दुरावा होता तो या दोघांच्या लेखनात नाहीसा झाला. त्यात एक संवादी नाते व विश्वासपूर्ण जवळीक निर्माण झाली. (संस्कृती, ५/पृ० ४१-४३)

हीच विश्वस्ताची भूमिका काहीशा गतानुगतिक वृत्तीने श्री०ना० पेंडसे, गो०नी० दांडेकर, व्यंकटेश माडगूळकर, म०मं० कर्णिक, हमीद दलवाई, चिं०त्र्यं० खानोलकर, जयवंत दळवी, वि०शं० पारगावकर यांच्या लेखनात दिसते. 'मूळ गावाकडचा पण नंतर शेरगावचा झाल्याच्या' अवस्थांतरातून त्यांच्या लेखनात उच्चवर्गीय मूल्यदृष्टी आल्याचे दिसते. ते उच्च पातळीवरून ग्रामीण जीवनाकडे पाहतात आणि नागर वाचकांना हे समजावून देण्याची भूमिका घेतात. (संस्कृती, ५/पृ० ४३-४५)

आतापर्यंतच्या प्रवासामुळे नागर वाचकांना संवादांमुळे बोलींचा परिचय होत गेला. संवादातील बोली वेगळेपणामुळे, चैतन्यरूपांमुळे, जिवंतपणामुळे वाङ्मयापुरती अधिक रोचक व हवीहवीशी वाटू लागली. त्यामुळे शंकर पाटील, उद्धव शेळके, मनोहर तल्हार, चंद्रकुमार नलगे यांच्या लेखनात बोलीतील संवादांचे प्रमाण वाढले. निवेदनातील नागर भाषेवर ग्रामीणतेचे अधिक संस्कार होऊ लागले. निवेदक ग्रामीणतेला अधिक जवळ आला. लेखकाची विश्वस्ताची भूमिका निष्प्रभ होऊ लागली. हा पाचवा टप्पा. (संस्कृती, ५/पृ० ४६)

सहाव्या टप्प्यावर ग्रामीण जीवन सच्च्या ग्रामीण रूपात रेखण्याच्या प्रेरणेतून आनंद यादवांनी अस्सल ग्रामीण बोली संवादासह निवेदनासाठीही वापरली. 'सत्यकथे'ने निर्माण केलेल्या कलाविषयक जाणिवा आणि स्वातंत्र्यानंतर ग्रामीणत्वाचा न्यूनगंड कमी होऊन आलेला आत्मविश्वास त्यामागे होता. आनंद यादव, रा०रं० बोराडे, महादेव मोरे हे स्वत: ग्रामीण जीवनाचा भाग होते. त्यामुळे मध्यस्थाच्या किंवा विश्वस्ताच्या भूमिकेचा येथे प्रश्नच नव्हता. याचा परिणाम म्हणून ग्रामीण साहित्य अंतर्बाह्य बदलले. (संस्कृती, ५/पृ० ४६-४७)

सातव्या टप्प्यावरच्या, १७७५ नंतरच्या साहित्यिकांनी, ग्रामीण साहित्याचे माध्यम म्हणून सरसकट ग्रामीण बोलीचा वापर मुक्तपणे व स्वाभाविकपणे करावयास आरंभ

केला. ग्रामीण साहित्य ग्रामीण भाषेतच लिहावयाचे असते अशी त्यांची समजूत दिसते. 'कलात्मक साहित्याचे माध्यम' एवढ्याच मर्यादित दृष्टीने ग्रामीण बोलींकडे त्यांनी पाहिले नाही. पांढरपेशांची प्रमाणभाषा त्यांनी नाकारली. ग्रामीण व प्रमाण भाषा यांच्या परस्परसंस्कारांचे प्रमाण त्यांच्या लेखनात वाढले. (संस्कृती, ५/पृ० ४८-४९)

इ०स० १८७७ पासून संपूर्ण अविश्वास, बहिष्कृत अवस्था व प्रतिकूल परिस्थितीला तोंड देत, वाङ्मयात चंचुप्रवेश मिळवत, वाङ्मयाचे स्वयंसिद्ध माध्यम व्हायला ग्रामीण बोलीला इ०स० १९८०पर्यंत शंभर वर्षांचा प्रदीर्घ व खडतर प्रवास करावा लागला. त्याची ऐतिहासिक अवस्थांतरे टिपत, ग्रामीण बोलीच्या उज्ज्वल भवितव्याविषयी आशावाद प्रकट करीत, यादव आपले विवेचन आटोपते घेतात. (संस्कृती, ५/पृ० ५०).

यादवांनी बोली आणि वाङ्मय यांच्या संबंधांचा जो विचार केला आहे तो रूढ पद्धतीचे ग्रामीण साहित्य डोळ्यांसमोर ठेवूनच. त्यामुळे भालचंद्र नेमाडे यांच्यासारख्या दमदार लेखकाचे साहित्य त्यांच्या नजरेतून निसटले आहे. नेमाड्यांच्या कादंबरीचा फलक खेड्यांपासून महानगरांपर्यंत पसरलेला आहे. पुणे, मुंबईपासून नगर, औरंगाबाद, धुळे, कोल्हापूर अशा वेगवेगळ्या भागांतील आणि जातीजमातींतील माणसांच्या वैशिष्ट्यपूर्ण बोलींचे अस्सल दर्शन त्यांच्या लेखनातून घडते. हिंदूधर्मीयांबरोबरच ख्रिश्चन, मुसलमान, पारशी अशा इतर धर्मीयांची मराठीही त्यांनी साहित्यात वापरली. त्यामुळे मराठीचा व्याप कसा आणि किती पसरला आहे त्याचे भान येते. अनेक ग्रामीण लेखकांप्रमाणे अण्णाभाऊ साठे, बाबुराव बागूल, योगिराज वाघमारे अशा किती तरी दलित लेखकांनीही बोलीला प्रतिष्ठा दिली. हमीद दलवाई, ना०धों० महानोर, नामदेव ढसाळ यांचे कादंबरीलेखनही यादृष्टीने महत्त्वाचे आहे. मराठी ग्रामीण बोलपटांचे संवाद लिहिणारे किती तरी लेखक येथे अस्पर्शित राहिले आहेत. ग्रामीण साहित्य या संज्ञेचा मर्यादित अर्थ गृहीत धरल्याचा हा परिणाम दिसतो.

सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे मध्ययुगीन मराठी साहित्याच्या श्रीमंत माहेराकडे यादवांचे झालेले दुर्लक्ष. खेडोपाडी विखुरलेल्या आणि अनेक थरांतून आलेल्या संतांची आणि शाहिरांची कविता लोकबोलीतून प्रकट झाली आहे. महानुभावांचे चरित्रलेखन विस्तृत प्रदेशातील मराठीचा व्याप-विस्तार कवेत घेणारे आहे. ग्रामीण बोलीच्या या समृद्ध वारशाशी ग्रामीण नवलेखकांनी आपले नाते जोडलेले नाही. ग्रामीण साहित्याच्या किरटेपणाचे हेही एक कारण आहे. आनंद यादवांसारखा ग्रामीण साहित्याच्या धुरिणांनी मध्ययुगीन ग्रामीण साहित्याकडे पाठ फिरविली या वस्तुस्थितीकडेही त्याचा काही वाटा जातो.

**प्रमाणभाषा, बोली आणि संस्कृती**

यातून प्रमाणभाषा, बोली आणि संस्कृती यांच्या बदलत्या संबंधांविषयीचा मुद्दा उद्भूत होतो. ग्रामीण व दलित साहित्याच्या निमित्ताने अनेकानेक बोलींचा लोंढा प्रमाण मराठीला मिळाला. मूळची ब्राह्मणी वळणाची प्रमाण मराठी भाषा हळूहळू निष्प्रभ ठरून बहुजनी वळणाची एक नवी प्रमाण भाषा महाराष्ट्रभर आकाराला येऊ लागल्याचे यादवांना दिसते (संस्कृती, ५/पृ० ५०). त्यातून प्रमाणभाषा व बोली यांची ते सामाजिक अंगांनी मीमांसा करतात (संस्कृती, ६/पृ० ५१-६५)

भाषा आणि बोली यांचे स्वरूप आणि संबंध याविषयी आनंद यादव यांना जे अभिप्रेत आहे ते अधिक नेमकपेणाने आपल्याला असे सांगता येईल - ''बोलींच्या पलीकडे असे भाषेला अस्तित्व नसते. संबद्ध बोलींचा समूह म्हणजेच भाषा होय. निरनिराळ्या वर्गीय आणि स्थानिक बोलींच्या परस्परसंबद्ध, कमी-अधिक आकलनक्षम आणि अस्तित्वापुरती भिन्नता राखणाऱ्या समूहाला आपण मराठी म्हणत असतो. मराठी हे अशाप्रकारे तिच्यात अंतर्भूत होणाऱ्या बोलींचे समूहवाचक व कल्पनावाचक नाव आहे. महाराष्ट्रातून बोलल्या जाणाऱ्या परस्परनिकट अशा अनेक बोलींचे ते समावेशक नाव आहे.'' (मंचरकर १९७५:१६१)

भाषेची ही व्यापक संकल्पना आणि बोलींची समान योग्यता या दोन तत्त्वांचा आधार घेऊन यादवांनी प्रचलित प्रमाण भाषा, बोली व संस्कृती यांची पुनर्मांडणी करणारा महत्त्वपूर्ण विचार मांडला आहे.

प्रमाण मराठी ही कोणतीही मराठी बोली बोलणाऱ्या माणसाला जवळची वाटणे आवश्यक असते. आजची प्रमाण मराठी तशी नाही. याविषयीचे असमाधान यादवांनी वेगवेगळ्या ठिकाणी व्यक्त केले आहे. 'महाराष्ट्र भाषेचा कोश' भाग १ (इ०स० १८२९) आणि मोल्सवर्थचा 'रस्त्यावर खेळणाऱ्या मुलाचे तोंडचे शब्दसुद्धा' घेतल्याचा दावा करणारा मराठी-इंग्रजी कोश (इ०स० १९३१) यांची धारणा ''महाराष्ट्रभाषा म्हणजे महाराष्ट्रदेशी राहणारे जे देशस्थ ब्राह्मणादिक लोक त्यांची बोलावयाची प्राकृत भाषा'' अशी होती. ''...देशभाषांचे वर्तनाचा असा नियम आहे की, स्वस्वदेशाचे मध्यभागी शुद्धरूपाने असावे आणि उत्तरोत्तर पर्यंत भागी तत्तदेशांतरस्थ भाषांचे मिश्रणाने संकीर्ण रूपाने असावे. महाराष्ट्र देशाचा मध्यभाग म्हटला असता, प्राय: पुणें प्रांत होतो.'' अशीही त्यांची भूमिका होती. प्रत्यक्षात मुंबई-पुण्यामध्ये स्थलांतरित झालेल्या तत्कालीन कोकणस्थ ब्राह्मणांची बोली ही प्रमाण व त्याशिवाय इतर प्रदेशातील विविध जातींची बोली ही संकीर्ण, अशुद्ध व अप्रमाण मानून प्रचलित प्रमाण मराठी घडविली गेली. कोश, व्याकरण, पाठ्यपुस्तके यांच्या आधाराने मेजर कँडीच्या नेतृत्वाने

व ब्राह्मण पंडितांच्या सहकार्याने घडलेली ही प्रमाण मराठी आहे.

खरं तर या प्रक्रियेत ब्राह्मण पंडितांबरोबर इतरांचेही सहकार्य घ्यावयास हवे होते. भौगोलिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या पुण्याऐवजी मराठवाड्याचा एखादा भाग मध्यवर्ती मानावयास हवा होता. लोकजीवनातील भाषेला व्याकरण, कोश व पाठ्यपुस्तके यांत सामावून घ्यायला हवे होते. या चुकांनी प्रमाण मराठी व इतर मराठी बोली यांच्यांत संबंध राहिला नाही. मोठी मानसिक दरी निर्माण झाली आणि सांस्कृतिक संघर्षाची बीजे पेरली गेली. (संस्कृती, ५/पृ० ३५-३८ आणि ६/पृ० ५३-५४)

ही प्रमाणभाषा एकप्रकारे शोषणाचे हत्यार बनली. न्यूनगंडाने पछाडलेले, भिन्न जाती व परिसरातून आलेले तरुण शिक्षित होण्यासाठी आपली बोली सोडून तथाकथित प्रमाणभाषा कष्टपूर्वक आत्मसात करतात. प्रमाणतेचा आग्रह धरला जातो. उच्चारणाचा सूर, हेल यांमुळे येत असूनही हुषार मुले वर्गात गप्प बसतात. प्रमाण लेखनाच्या कसोटीवर त्यांना परीक्षेत कमी गुण दिले जातात. एखादा उमेदवार नोकरीत नाकारला जातो. मते किंवा ज्ञान हे बोलीतून व्यक्त झाल्यामुळे हास्यास्पद ठरविणे हा भाषिक जुलूम आहे. सामान्य माणसाची बोली रक्तातल्या पेशीसारखी त्याच्या जीवनाचा भाग असते. निरनिराळ्या निमित्तांनी त्याला ती सोडायला लावणे म्हणजे सामाजिक संघर्षाला आमंत्रण देण्यासारखे असते. (संस्कृती, ६/पृ० ५८-६१).

स्वातंत्र्योत्तर काळात लोकशाही आणि शिक्षणप्रसार यामुळे उपेक्षित समाजघटकांत आज जागृती आली आहे. आजचा राज्यकर्तावर्ग ग्रामीण बहुजनसमाजातून आलेला आहे. त्याच्या भाषेचा प्रभाव समाजावर पडत आहे. मराठीच्या निरनिराळ्या बोलींतून होणाऱ्या साहित्यनिर्मितीला वेग आलेला आहे. हे उपेक्षित पण आता जागृत, प्रगत व शिक्षित असे समाजघटक प्राध्यापक, शिक्षक, डॉक्टर, इंजिनियर, वकील, अशा पांढरपेशा व्यवसायांतही प्रविष्ट झाले आहेत. हे सारे आपल्या बोलीच्या अनेक अर्थच्छटा, ध्वनिच्छटा, शब्द, वाक्यप्रयोग, म्हणी, वाक्यरचनेचे विशेष आणि बोलीचा स्वभाव प्रमाणभाषेला नेऊन भिडवीन आहेत. तिला प्रादेशिक रंगाने रंगवीत आहेत. (संस्कृती, ६ /पृ० ५४,५७,६०,६१)

बोलींविषयीची घृणा आणि तुच्छता सोडून या प्रक्रियेचे भाषिक पातळीवर सामाजिक एकात्मतेची भावनेने आपण स्वागत केले पाहिजे. एखाद्या समाजाला त्याची भाषा सर्व क्षेत्रांत सन्मानपूर्वक वापरू दिली तर तो समाज सर्वांगांनी फुलून येण्यास साहाय्यच होईल. मराठीच्या बोली समजून घेणे, म्हणजे व्यापक अर्थाने आपली मराठी मातृभाषाच समजून घेणे होय. या प्रक्रियेने मराठी भाषेचा पूर्णावतार दृष्टिपथात येईल. बोलीतील नादांचे हेलकावे, नवनव्या भाषिक लकबी, भावव्यक्तिकरणाच्या वेगवेगळ्या

पद्धती यांचे आकलन होऊन मोहोरल्यासारखे होईल. ग्रामीण साहित्यिकांनी बोलीची गावरान रूपे अस्मितापूर्वक जपली आहेत. त्यामुळे आज बोलींना नवी जाग, नवी उभारी आली आहे. (संस्कृती, ६/पृ० ५५,५६,५७). निरनिराळ्या कारणांनी, वेगवेगळ्या बोली बोलणारे लोक आज एकत्र येत आहेत. त्यातून स्वत:ची बोली आणि प्रमाणभाषा यांच्या सरमिसळीतून नवी मराठी भाषा घडू लागली आहे. (संस्कृती, ६/पृ० ६१).

भाषा ही एक सामाजिक संस्था आहे. समाजाबरोबर भाषा बदलली नाही तर ती जाचक, कालबाह्य व निरुपयोगी ठरेल. अशा परिस्थितीत नव्याने येऊ घातलेल्या भाषारूपांची टिंगल करणे, उपहास-उपरोध करणे, हेटाळणी करणे आणि प्रस्थापित प्रमाणभाषेच्या रूपाला चिकटून बसण्याचा दुराग्रह धरणे अयोग्य आहे. (संस्कृती, ६/ पृ० ५४).

प्रमाणभाषा बदलत्या परिस्थितीनुसार बदलली पाहिजे; हे धोरण स्वीकारून बदलाचा आरंभ स्वत:पासून केला पाहिजे; यासाठी यादवांनी काही विचारार्ह सूचना केलेल्या आहेत. त्या त्या प्रादेशिक संस्कृतींचा परिचय उत्तम तऱ्हेने करून देणारे प्राथमिक शिक्षण हे त्या त्या प्रादेशिक बोलीतूनच दिले पाहिजे. माध्यमिक शाळेपासून प्रमाणभाषेत शिकवावे. क्रमिक पुस्तकात पांढरपेशा, बुद्धिजीवी संस्कृतीचेच दर्शन घडते. त्यामुळे ग्रामीणांना स्वत:च्या जीवनाविषयी न्यूनगंड वाटू लागतो. यासाठी सर्व समाजाचे चित्र बोलींमधून मांडणारे लेखनही त्यात समाविष्ट करावे. विद्यार्थ्यांचे ज्ञान पाहावे, त्याची लेखनपद्धती पाहू नये. बोलींचा गोडवा, वेगळेपण आणि महत्त्व विद्यार्थ्याला पटवून द्यावे. शिक्षक, प्राध्यापक, लेखक, संपादक-समीक्षक यांची शिबिरे घ्यावीत. त्यांच्यात ही नवी भाषाविषयक जाणीव निर्माण करावी. असे झाले तरच प्रमाणभाषा व बोली यांच्यात सख्खे नाते निर्माण होईल. (संस्कृती, ६/ पृ० ६०,६३,६४,६५).

यासाठी नवी समृद्ध समावेशक प्रमाणभाषा घडविली पाहिजे. पशु, पक्षी, झाडे, पिके यांची विविध नावे, निसर्गाच्या, ऋतूंच्या, पावसाच्या विविध छटा, शेतीसंस्कृतीचा सनातन तपशील हे अजून आपल्या प्रमाणभाषेला माहीतच नाहीत ते या प्रक्रियेमुळे परिचित होतील. उच्चारणातील गोडवा, त्यामुळे बदलणाऱ्या अर्थच्छटा परिचित होतील. त्या त्या प्रदेशातील संवेदनांचे आणि जाणिवांचे विश्व लाभल्याने आपली प्रमाणभाषा समृद्ध होईल. विविध प्रादेशिक संस्कृती व्यापक मराठी संस्कृतीशी एकात्म होण्यासाठी आणि सामाजिक एकता व समता निर्माण व्हायला मदतच होणार आहे. (संस्कृती, ६/पृ० ६२).

भविष्यात प्रमाणभाषा आणि बोली एकमेकींच्या गळ्यात गळे घालून वावरण्याचा

काळ लांब नाही. प्रत्यक्षात नसले तरी मानसिक पातळीवर समाजाने समतेची भूमिका स्वीकारली आहे. साहित्यात याच मानसिकतेचा आविष्कार होत असतो. त्यामुळे उद्याच्या साहित्यातही समग्र समाज हेच केंद्र राहील. त्याची भाषा विविध बोलींच्या संस्कारांनी घडविलेली नवी प्रमाणभाषा असेल; असा आशावाद यादवांनी इतरत्र व्यक्त केला आहे. (संस्कृती, ५ /पृ० ५०). 'साहित्यातील प्रमाणभाषा व ग्रामीण भाषा' असे शीर्षक या लेखाला यादवांनी दिलेले आहे. तथापि त्याचा साहित्याशी तितकासा संबंध नाही. त्यातील विचार मुख्यत: प्रचलित प्रमाण मराठी आणि इतिहासाच्या ओघात बदलत गेलेल्या सामाजिक परिस्थितीने बोलींमध्ये व बोली बोलणाऱ्या समाजांमध्ये घडविलेले परिवर्तन हा आहे. या दोन्हींच्या संबंधांची ते चर्चा करतात.

अभ्यासासाठी एखादा विषय निवडणे आणि व्यासंगपूर्वक तो मांडणे हा यादवांच्या वैचारिक लेखनाचा स्वभाव नाही. त्यामुळे पुरेसे संदर्भ शोधून ते आपल्या विवेचनाला शास्त्राचे पाठबळ देत नाहीत. ना०गो० कालेलकरांच्या 'भाषा आणि संस्कृती'चा ते आधार घेतात, तथापि त्यांच्याच 'भाषा : इतिहास आणि भूगोल'चा उल्लेखही करीत नाहीत. र० बा० मंचरकरांचे 'भाषाशास्त्रविचार' त्यांच्या नजरेतून निसटते. ग्रिअर्सनने केलेला मराठीच्या बोलींचा अभ्यास किंवा डेक्कन कॉलेजचा बोलींचा अभ्यासप्रकल्प त्यांच्या विवेचनात दुर्लक्षित राहतो.

आनंद यादव स्वत:ला पडलेल्या प्रश्नांच्या उत्तरासाठी अभ्यास व विचार करतात. प्रत्यक्ष वस्तुस्थिती हाच त्यांच्या चिंतनाचा आरंभ असतो. त्यांचे लेखन विशिष्टाकडून सामान्याकडे जाणारे म्हणजे विगमनात्मक वळणाचे आहे. स्वानुभव आणि निरीक्षण यांतून जाणवलेल्या वास्तवाचा अन्वयार्थ लावण्याचा त्यांचा प्रयत्न असतो. त्यातून गवसलेले निष्कर्ष ते वाचकांसमोर ठेवतात. त्यामागे त्यांचा अनुभव असतो. चिंतन असते आणि विशिष्ट अशी भूमिकाही असते.

मराठी प्रमाणभाषेच्या घडणीवर त्यांनी घेतलेले आक्षेप किंवा दाखविलेल्या उणिवा रास्त आहेत. पण त्यांच्या कल्पनेतल्या नव्या प्रमाणभाषेचे स्वरूप कसे घडेल, कसे असेल ते नीटसे स्पष्ट होत नाही. अर्थात हे भाषावैज्ञानिकांचे काम आहे. यादवांचे काम मराठी भाषा, बोली व समाज यात घडणारे परिवर्तन ठळकपणे लक्षात आणून देण्याचे आहे. ते त्यांनी चांगले केले आहे.

**समारोप**

एक प्रतिभावंत लेखक म्हणून आनंद यादवांना ग्रामीण साहित्याचे माध्यम म्हणून ग्रामीण बोलीची अपरिहार्यता जाणवत होती. त्याविषयीच्या आक्षेपांचा परामर्श घेत त्यांनी कलामाध्यम म्हणून बोलींचा विचार केला. तिची आवश्यकता प्रतिपादन केली.

माध्यम म्हणून तिच्या मर्यादा सांगितल्या आणि विकासाच्या दिशाही दाखविल्या. कलामाध्यम म्हणून तिचा वाङ्मयीन प्रवास कसकसा होत गेला ते न्याहाळले. तिच्या हेळणेत आपली समाजव्यवस्था हीही कार्यरत आहे हे उमगल्यावर व्यापक समाजजीवनातील बोलींची अवरुद्धता जाणवली आणि नव्या प्रमाणभाषेची गरज त्यांनी बोलून दाखविली.

साहित्यापासून सुरू झालेला हा बोलीविचार समाजापर्यंत जाऊन भिडतो. प्रमाणभाषा आणि बोली यांच्या साहित्यगत आणि समाजगत अशा बदलत्या संबंधांचे एक विचारप्रवृत्त करणारे निरीक्षण त्यांनी मांडले. भाषेविषयी सजग असलेल्या एका लेखकाची ही निरीक्षणे आहेत. ती साहित्यसमीक्षा, साहित्यमीमांसा, भाषाविज्ञान, समाजशास्त्र आणि संस्कृतिमीमांसा यांच्या अभ्यासकांना खाद्य पुरविणारी आहेत.

आनंद यादव यांच्या भाषाविचाराला मर्ढेकरप्रभावित समीक्षा आणि वाङ्मयीन वातावरण यांचा विशिष्ट कालसंदर्भ आहे. नववाङ्मयीन प्रवाहांच्या जन्मकाळातील अटीतटीच्या वादांचा आणि संगरांचा संदर्भ आहे.

बदलती परिस्थिती आणि सामाजिक संक्रमण यांच्याशी जोडलेल्या भाषिक स्थित्यंतराचा अन्वयार्थ लावताना यादव स्वानुभव व निरीक्षण यांचा आधार घेतात. अंदाज करतात. अनुमान करतात. त्यामुळे हे लेखन उलटसुलट विचार, कल्पना, आडाखे यांनी भरलेले आहे. त्याचे आशयद्रव्य सरकते, हलते, बदलते आहे. या सगळ्यांची वाङ्मयीन स्थित्यंतराशी सांगड घालण्याचा त्यांचा प्रयत्न आहे.

त्यांचा पिंड व्यासंगसमृद्ध शास्त्रीय लेखन करणारा पंडिती वळणाचा नाही. त्यामुळे ते सिद्धांत, तत्त्वे, संकल्पना, युक्तिवाद, कार्यकारण, तुलना, परिभाषा यांचा काटेकोर वापर करीत लिहीत नाहीत. ते कलावंत-समीक्षक (पोएट-क्रिटिक) आहेत. अव्वल दर्जाचे कलावंत असल्याने कलानिर्मितिप्रक्रिया हा त्यांच्या कुतूहलाचा, अनुभवाचा, चिंतन-मननाचा विषय आहे. त्यातून त्यांना साहित्यतत्त्वांचे आकलन होते. त्याच पद्धतीने ते विधानांची मांडणी करतात.

त्यांच्या लेखनात स्फुरणशील आणि सर्जनशील विचार-चिंतनाचा आढळ होतो. त्यात बारकावा आणि सूक्ष्मता येते. अनेक अंगोपांगांचा उलगडा होतो. साक्षात्कारी अभिनवतेचा प्रत्यय येतो.

यादवांच्या भाषाविवेचनाचा आरंभ कलावंत-समीक्षकाच्या भूमिकेतून होतो. पण त्याचा शेवट मात्र सांस्कृतिक भाष्यकाराच्या भूमिकेजवळ होतो. बोलीचा प्रश्न हा केवळ साहित्याच्या माध्यमाचा प्रश्न नाही, केवळ व्याकरण-भाषाविज्ञानाचा प्रश्न नाही, तर तो सामाजिक सांस्कृतिक प्रश्न आहे; या व्यापक जाणिवेजवळ येऊन ते थांबतात.

आनंद यादव यांचा भाषाविचार तर्क आणि शास्त्र यांच्या कसोटीवर घासला तर काय हाती येईल; ते निश्चित सांगता येत नाही. पण तरीही त्यात काही मौलिक विचारकण आहेत. कलानिर्मितीच्या वाटेने गवसलेली तथ्ये आणि सत्ये आहेत; एवढे नि:संशय.

**संदर्भ :** मंचरकर, र०बा०, १९७५. भाषाशास्त्रविचार. युनिर्व्हसल प्रकाशन, कोल्हापूर.

**टीप १ :** या लेखात आनंद यादव यांच्या चार लेखांतील विवेचनाचा विचार केला आहे. ते लेख यादवांच्या दोन पुस्तकांत समाविष्ट आहेत. त्या ग्रंथांची शीर्षके व त्यांचा संदर्भ देताना वापरलेले संक्षेप पुढे दिले आहेत :

'स्वरूप' = 'ग्रामीण साहित्य : स्वरूप आणि समस्या'

'संस्कृती' = 'मराठी साहित्य, समाज आणि संस्कृती'.

**टीप २ :** या लेखाचा पूर्वार्ध उन्हाळा २००९ (वर्ष २७, अंक २)मध्ये प्रसिद्ध झाला आहे.

■

**श्रीस्वामीसमर्थ**, 19, **नंदनवन कॉलनी, कोहिनूर मंगल कार्यालयासमोर,**
**सावेडी, अहमदनगर** 414 003. **दूरभाष :** (0241) 242 3575)

**काही म्हणी**

'मी शिवाजीराजे बोलतोय' या चित्रपटात वापरण्यात आलेल्या चपखल म्हणींमुळे चित्रपटागृहात वारंवार हास्यस्फोट होतात. त्या म्हणी पुढे दिल्या आहेत :

(१) जवा येती चांगली वेळ, तवा गाजराचं बी होतय् केळ.
(२) आले घोड्यावर अन् गेले गाढवावर
(३) खातो धन्याचं अन् नाव घेतो गन्याचं.
(४) आधीच हौस त्यात पुन्हा पडला पाऊस
(५) केसंभर गजरा अन् गावभर नजरा
(६) कावळ्याच्या हातात दिला कारभार अन् त्यानं घाण करून भरला दरबार
(७) बाभळीचा काटा - मागं बोचटं अन् पुढं तिखट.

**(सौजन्य : श्री० मंदार पटवर्धन)**

# शैलीविशिष्ट दृष्टिकोनातून 'करुणाष्टके'

**विजया देव**

श्री समर्थ रामदास यांच्या वाङ्मयातील एक प्रमुख आणि सर्वश्रुत निर्मिती म्हणजे करुणाष्टके. 'अनुदिनि अनुतापे', किंवा 'तुजवीण रामा मज कंठवेना' यांसारखी करुणाष्टके सर्वपरिचित असली तरी ज्यांना करुणाष्टके म्हणता येईल अशा रचना बऱ्याच आहेत. त्यांची संख्या १२९ आहे (देशपांडे, अ०ना०, १९७८). प्रत्येक करुणाष्टकातील श्लोकांची संख्याही वेगवेगळी आहे; 'अष्टक' म्हणजे आठाच्या मर्यादेत ती नाहीत. 'कैं भेटसी बा मजला समुद्रा' ही रचना तर फक्त एकश्लोकी आहे. तर 'सोपा मार्ग विहंगमु'मध्ये २४ श्लोक आहेत.

या छंदोबद्ध आर्त उद्गारांचा प्रभाव मात्र मराठी मानसावर टिकून राहिलेला आहे. व्यंकटेश माडगूळकर आपल्या आईबद्दल लिहिलेल्या साहित्यकृतीलाच 'करुणाष्टक' असे नाव देतात, तर दिलीप प्रभावळकर आपल्या स्फुट लेखन-संग्रहाला 'अनुदिनी' हे शीर्षक देतात. रामदास भटकळ यांच्या 'मोहनमाया' या शीर्षकातूनही 'मोहमाया', 'स्वजनमाया' याचे पडसाद जाणवतातच.

करुणाष्टकांच्या शैलीवैज्ञानिक अभ्यासासाठी मोजक्याच रचना - खरे तर तीन-चार उदाहरणे - मी निवडली आहेत.

ज्या साहित्यकृतीचे सौंदर्य आपल्याला कळत-नकळतपणे जाणवलेले असतेच, त्या सौंदर्याचे भाषिक गमक शैलीविज्ञानाच्या अंगाने विशद केले असता आपला आस्वाद अधिक डोळस होतो. या उपयोजनासाठी निवडलेल्या पदरचनांची उदाहरणे पुढीलप्रमाणे :

**(१) प्रउर्ती निउर्ती (सोपा मार्ग विहंगमु)**

रामदासांची भाषा वरवर पाहता शब्दरूपदृष्ट्या सदोष वाटली तरी ती संस्कृत रूपांना बोलभाषेत वेगळ्या पद्धतीने रुजविणारी आहे. संस्कृत शब्दांची तद्भवरूपे ते काव्यरचनेच्या ओघात सहज करून टाकतात. असे शब्द वरवर पाहता कसे तरी योजून टाकलेले वाटले तरी शैलीदृष्ट्या ही मोडतोड रचनेच्या आशयात भरच घालते. इथे उदाहरण पाहू 'प्रउर्ती निउर्ती' या शब्दांचे.

‘सोपा मार्ग विहंगमु’ या रचनेत रामदास म्हणतात,

ज्ञान तो जाणिजे देवो । ज्ञानें परत्र पावणें ।
प्रउर्ती निउर्ती ज्ञानें । ज्ञानें मोक्षची पाविजें ॥२३॥

(प्रवृत्ती आणि निवृत्ती या शब्दजोडीचे रामदासांनी खुशाल प्रउर्ती-निउर्ती करून टाकले आहे. या घटिताकडे थोडे बारकाईने पाहू.)

या पूर्ण रचनेचा सारांश : जन्मोजन्मी चुकतमाकत, परोपरी दुःख झेलत माणूस आता टेकीला आलेला आहे. त्याला विद्या नाही, बुद्धी नाही, अन्नवस्त्रही नाही. असा अनाथ, रंक माणूस पतितपावन देवाची करुणा भाकतो की, ‘सांभाळी गा दयानिधी’. सर्व भरवसा त्याच्यावर ठेवतो तेव्हा कुठे ‘वोळला मेघ सुखाचा’ अशी स्थिती येते आणि ‘धन्य गा पावना देवा’ असे तो कृतकृत्य होऊन म्हणतो. त्याला साक्षात्कार होतो की,

ज्ञान तो जाणिजे देवा । ज्ञानें परत्र पावणें ।
प्रउर्ती निउर्ती ज्ञानें । ज्ञानें मोक्षची पाविजें ॥२३॥
पीप्लीकामार्ग ठाकेना । सोपा मार्ग विहंगमु ।
अनन्य भक्तीच्या योगे । धन्यधन्यची होईजे ॥२४॥

या अवस्थेतून जाणारा, रामदासांनी वर्णिलेला भक्त बोलता-चालता येना, विसर्णे चुकणे सदा । हारणे गाहाळे काही । मारामारी धबाधबी ॥ अशा प्रकारचा, भक्तीही करता न करता येणारा आणि करुणार्त झालेला आहे. त्याच्या तोंडी प्रवृत्ती-निवृत्ती असे सुस्पष्ट, संयुक्ताक्षरांचा आघात असलेले तत्सम शब्द कसे शोभले असते? साहित्याची भाषा खुद्द लेखकाची भाषा नसते, कल्पनाजनित सृष्टीतील चिन्हांची असते. म्हणून प्रउर्ती-निउर्ती हे शब्द तिथे येतात. या चार चरणांत ‘ज्ञान’ हा शब्द चार वेळा येतो. येथे मुख्य प्रतिपाद्य विषय, लक्ष वेधून घेण्याचा विषय आहे, ज्ञान. प्रवृत्ती-निवृत्ती नव्हे. त्यामुळेही, हे शब्द तत्सम ठेवले असते तर आघात त्यांच्यावर येऊन ‘ज्ञान’ शब्दावरचा झोत ढळला असता. ते रामदासांना नको होते.

म्हणून त्यांनी प्रवृत्ती-निवृत्ती या शब्दांची अक्षरवटिका बदलली. प्रवृत्ती-निवृत्तीमध्ये प्रत्येकी तीन-तीन अक्षरे आहेत, तर प्रउर्ती निउर्ती मध्ये ती दोन-दोनच आहेत. प्रवृत्ती-निवृत्तीमधला ‘व्’ हा अर्धस्वर, आणि ‘ऋ’ कार्यात्मक दृष्टीने स्वर, पण वस्तुतः व्यंजन यांची वृत्तीच त्यांनी पालटून टाकली. अर्धस्वर व् ऐवजी ‘उ’ हा स्वर आला आणि ‘ऋ’ ऐवजी ‘र्’ हे कंपक व्यंजन. प्रवृत्ती-निवृत्तीमधील ‘त्त’ या संयुक्ताक्षरातील एका ‘त्’ या व्यंजनाचा लोप झाला. त्यामुळे हे शब्द आघातशून्य होऊन त्यात सहजपणा आला, जो वेदविधी न जाणणाऱ्या आर्त भक्ताला शोभेसा

आहे; 'सोपा मार्ग विहंगमु' शोधणाऱ्या भक्ताला साजेसा आहे.

अशा प्रकारे रामदासांच्या शब्दयोजनेकडे पाहिले तर काव्य म्हणून या रचनांचा दर्जा उंचावतो. शिवाय असे शब्दप्रयोग करण्यामागे रामदासांचाही विशिष्ट दृष्टिकोन आहे. त्यांनी म्हटलेलंच आहे :

भाषापालटे कांहीं । अर्थ वायां जात नाही ।
कार्यसिद्धी ते सर्वही । अर्थाच पासीं ॥

महत्त्व आहे ते भाषारूपापेक्षा अर्थरूपाला. भाषाभेदाश्च वर्तन्ते ह्यर्थ एको न संशयः।

**(२) सबळ जनक माझा राम लावण्यपेटी**

लावण्यपेटी या शब्दाचे 'पेटी' ऐवजी 'कोटी' किंवा 'पोटी' असे पाठभेद आढळतात.

| | | | |
|---|---|---|---|
| लावण्यपेटी | - रिसबूड-अष्टपुत्रे | शके १८३३, | पृ० ४२ |
| | - शं०श्री० देव | शके १८४१, | पृ० ११२ |
| | - अ०वा० देशपांडे | सन १९७८, | पृ० ३१ |
| | - के०भि० ढवळे प्रकाशन | सन - | पृ० ८९ |
| लावण्यकोटी | - गं०बा० सरदार | सन १९७२, | पृ० ११९ |
| लावण्यपोटी | - अश्विनी धोंगडे यांनी आपल्या चर्चासत्र-निबंधात नमूद केलेला संदर्भ. (संपा० : शं०श्री० देव, प्रकाशक के०भि० ढवळे) | | |

'करुणाष्टके : एक भाषिक विश्लेषण' या निबंधात 'लावण्यपोटी' या शब्दाबद्दल अश्विनी धोंगडे असं विधान करतात की ही उपमा गद्य, रसहीन व पुढच्या ('म्हणउनि मज पोटी' या) शब्दाशी जवळीक साधण्यासाठी येते.

'लावण्यकोटी'बद्दल सरदारांचे काही भाष्य नाही. त्यांनी संपादित केलेल्या पुस्तकात तो तसा छापला आहे एवढेच.

काय आहे 'लावण्यपेटी'चा अर्थ? 'लावण्य'चा अर्थ उघडच आहे, तो म्हणजे सौंदर्य. पेटीचा एक अर्थ सामान ठेवायचा करंडा असा असला तरी तो इथे गैरलागू वाटतो. पेटीचा दुसरा अर्थ होतो -

[ पाण्यावर तरंगण्याचे साधन; a float; a contrivance used for staying afloat while swimming. एकीं यजनक्रियेंची पेटी । घातली बांधौनि पोटी; ज्ञा० ७.८६ प्रेमाचिया पेटी बांधोनिया पोटीं, नाम० ४०० ]
(तुळपुळे - फेल्डहाउस, १९९९)

कन्नड 'पेट्टि'वरून हा शब्द आलेला आहे.

उदाहरणादाखल दिलेल्या ज्ञानदेव व नामदेव यांच्या रचनांमध्येही 'पेटी' पाठोपाठ 'पोटी' शब्द आलेला दिसतो; कारण पाण्यावर तरंगण्यासाठी बांधायचे साधन हे पोटावरच बांधायचे असते. पेटी या शब्दाचा हा अर्थ पाहिला की रामदासांनी 'लावण्यपेटी' हा नावीन्यपूर्ण शब्द घडवल्याचे लक्षात येते. रामदासांचा राम हा नुसती भवसागर तरून जायची पेटी नाही तर तो रूपमनोहर, लावण्यपेटी आहे. तो सबळ जनक आहे. भक्ताला तारून न्यायला समर्थ आहे.

ज्ञानदेव, नामदेव यांनी 'पेटी' आणि ती पोटी बांधणे यांची जितक्या प्रत्यक्षपणे सांगड घातली आहे, तशी ती रामदास घालत नाहीत. तळमळ, किंवा आंतरिक ओढ, उमाळा व्यक्त करायचा झाला तर मराठीत (आणि भारतीय भाषांमध्ये) 'पोटात तुटणे', 'काळजाला हात घालणे', 'जीव गोळा होणे', 'आतड्याची माया' अशा शारीर पातळीवर तो व्यक्त होतो. त्याच अत्यंत हृद्य पद्धतीने रामदास म्हणतात,

सबळ जनक माझा रामलावण्यपेटी
म्हणउनी मज पोटी लागली आस मोठी

करुणेचा पूर, कारुण्यसिंधू, जलचर जळवासी या शब्दसंहतींमधून त्यांनी पेटीशी संलग्न प्रतिमासृष्टी निर्माण केली आहे.

शिवाय, 'लावण्य' हा फक्त 'सौंदर्या'चा समानार्थी शब्द नाही. त्यात अधिक अर्थछटा आहे. लावण्य म्हणजे 'लवणस्य भाव:'. कोणतीही अ-लवण, अळणी गोष्ट नुसती सुंदर असली तरी रुचत नाही. लावण्य म्हणजे असे 'लवणभाव' असलेले सौंदर्य; मिळमिळीत, नीरस, सपक सौंदर्य नव्हे आणि रामदासांचं 'मिळमिळीत अवघेचि टाकावे' हे वचन प्रसिद्ध आहे. असा सावळा, कोदंडपाणि राम रामदासांना अभिप्रेत आहे. त्याला त्यांनी 'तू सागर करुणेचा', 'करुणासमुद्र', 'कारुण्यसिंधू' अशी क्षारसमुद्राची उपमा दिलेली आहे.

त्यामुळे तर ''लावण्यपेटी'' ही विशेषणनिर्मिती कितीतरी अर्थसघन होते.

**(३) उत्तम गुण मज दे रे राम : पावनभिक्षा**

'उत्तम गुण मज दे रे राम' या चौपदीत रामदासांनी पावनभिक्षा मागितली आहे. पावनभिक्षा हे एक प्रकारचं पसायदानच आहे. आधी त्याचं भाषिक वैशिष्ट्य पाहू.

या रचनेत रामदासांनी चौतीस उत्तम गुण मागितले आहेत. पहिल्याच चरणात त्यांनी रामाला 'दीनदयाळा' आणि शेवटच्या चरणात 'गुणधामा' म्हटलेलं आहे. राम दीनदयाळ आहे म्हणून त्याच्याजवळ मागणी करायची आहे, आणि त्याच्याचजवळ करायची, कारण तो स्वत:च तर गुणधाम - समस्त गुणांचं आश्रयस्थान - आहे, म्हणून. 'दीनदयाळ' आणि 'गुणधाम' यांच्या कोंदणात रामदासांनी मधोमध रामाला

स्थापित केलं आहे. संपूर्ण रचनेत 'राम' हे एकच एक संबोधन त्यांनी वापरलं आहे - एकंदर ३९ वेळा. 'दे रे राम!' हे संबोधन या काव्यरचनेला एकात्म परिणामाकडे घेऊन जाते.

प्रत्येक चरणाच्या शेवटी येणाऱ्या 'राम' या संबोधनात 'रा'साठी ओठ विलग, विवृत झाल्यावर 'म' हे ओष्ठ्य अनुनासिक स्पर्श व्यंजन येते. तेच चरणाच्या अंत्यस्थानी असल्यामुळे दोन्ही ओठ मिटलेले राहतात आणि फक्त अनुनासिकत्वाचे गुंजन किंचित काळ चालू राहते. त्यातून भक्तिलीन भाववृत्ती सातत्याने टिकून राहते. नादगुणाच्या या प्रचीतीमुळे 'दे रे राम !' या आर्तसुराची परिणामकारकता पराकोटीची वाढते. [तुळा : हिन्दी अनुवाद : डॉ० सच्चिदानंद परळीकर, लोकनायक समर्थगुरू रामदास परिशिष्ट, पृ० २४३, २००२. इलाहाबाद, लोकभारती]

या पावनभिक्षेतील उत्तम गुण हा वेगळ्या विवेचनाचा विषय ठरेल. इथे एवढंच म्हटलं तरी पुरे की कर्तृत्वसंपन्न, परहितकारी, ऐहिक-पारमार्थिक, ऐश्वर्ययुक्त जीवनासाठी लागणारे सर्व गुण रामदासांनी रामाजवळ मागितले आहेत. आजच्या शिक्षणशास्त्रज्ञांना, व्यवस्थापन-तज्ज्ञांना, व्यक्तिमत्त्वविकास-समुपदेशकांना आणि आध्यात्मिक गुरूंना हेवा वाटावा अशी यादी रामदास देतात, तीही इतक्या आटोपशीर भाषिक अवकाशात.

या रचनेतील एका सध्या प्रचलित नसलेल्या शब्दाबद्दल. तो शब्द म्हणजे 'धातमाता.' धातमाता दे रे राम । अनेक धाटी दे रे राम । या शब्दाचा उलगडा व्हावा म्हणून अर्थविवरण देते.

धातमात f [ क.मातु ] (धातु = स्वररचना; मातु = शब्दरचना) शब्द आणि स्वर यांचे कौशल्य

नेणे धातमात, नव्हे कळावंत नाम - १४३०;

धातमात करी, नटे नाना परी नाम १८३१;

धातमात नेणे देवा. नाम १९९८ (तुळपुळे - फेल्डहाउस, १९९९)

सुरुवातीला म्हटलं की पावनभिक्षा हे एक प्रकारचं पसायदान आहे. ज्ञानेश्वरांचं पसायदान हे एक भव्य मागणं आहे यात शंकाच नाही. पण ते ज्ञानेश्वरांनी सर्व जगासाठी विश्वात्मक देवाकडे मागितलेलं आहे. त्यात आपल्याला, एकेका सुट्या व्यक्तीला स्वत: काही करायचं आहे, असं नाही. उलट, रामदासांच्या शब्दात 'दे रे राम' ही भिक्षा आपण स्वत: एकेकट्याने, मन:पूर्वक मागायची आणि आपल्या व्यक्तिमत्त्वाच्या सर्व स्तरांवर त्याप्रमाणे बदल घडवून आणायचा आहे.

दोन्ही शब्दबंधांमध्येही रचनासाधर्म्य आहे. पसायदान आणि पावनभिक्षा यांतील 'भिक्षा' या शब्दाविषयी थोडे. भिक्षा हे प्रापंचिक-पारमार्थिकांचे उपजीविकेचे

(तीर्थाटनातही) साधन. रामदासप्रणीत धर्मामध्ये भिक्षा मागण्यासंबंधीचे काटेकोर नियम आहेत. तिचं प्रयोजन आणि पद्धती बौद्धधर्मापेक्षा वेगळी आहे. धर्मकारण, समाजकारण, राजकारण आणि व्यक्तिजीवन यांच्या चौपदरीत या शब्दाच्या अर्थाचा मागोवा घेता येतो. त्याचंच उन्नयन पावनभिक्षेत झालेलं आहे. रामदास-वाङ्मयातील भिक्षा, करुणा, दास, ब्रीद, उदासीन या धार्मिक अर्थक्षेत्रातील शब्दांचा विचार सामाजिक भाषाविज्ञानाच्या अंगाने करता येईल. अशा शब्दांना 'की-वर्ड्ज' अशी संज्ञा आहे. की-वर्ड्ज (" 'Key-words' are terms which crystallize the ideals of a particular society :...." Stephen, Ullman, 1973, p.32) म्हणजे एका विशिष्ट काळातील, विशिष्ट समाजाचे आदर्श ज्यात मूर्त झालेले असतात असे शब्द. एखाद्या लेखकाच्या साहित्यात येणाऱ्या अशा शब्दांमधून समाजमानसाच्या घडणीचा मागोवा घेता येतो. पण तो वेगळ्या अभ्यासाचा विषय आहे.

**संदर्भ :** तुळपुळे, शं०गो० व ॲन फेल्डहाउस. १९९९. ए डिक्शनरी ऑफ ओल्ड मराठी. पॉप्युलर प्रकाशन, मुंबई.

देशपांडे, अ०ना० १९७८. श्री समर्थ रामदासांची करुणाष्टके. अमेय प्रकाशन, नागपूर.

Ullman, Stephen. 1973. Meaning and Style. O.U.P.

[पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात ११ व १२ जानेवारी २००८ रोजी रामदासांवर राष्ट्रीय चर्चासत्र पार पडले. या चर्चासत्रात 'करुणाष्टकांचा शैलीवैज्ञानिक अभ्यास' या विषयावर सादर केलेल्या निबंधावर आधारित]

■

सुप्रिया, 61/14, एरंडवणे, प्रभात रोड, 14वी गल्ली, इन्कमटॅक्स ऑफिसजवळ, पुणे 411 004.
दूरभाष : (020) 2546 8693

## अनुकरणीय देणगी

प्रा० कृष्ण श्री० अर्जुनवाडकर यांनी परिषदेला रु. १,०००/-ची देणगी दिली आहे. यापूर्वीही आपल्या पुस्तकांच्या विक्रीतून मिळणारे उत्पन्न परिषदेला देणगी म्हणून मिळावे यासाठी त्यांनी पुस्तकांच्या प्रती परिषदेला दिल्या होत्या. (त्यातील काही प्रती परिषदेकडे अजूनही उपलब्ध आहेत.) परिषद प्रा० अर्जुनवाडकरांची ऋणी आहे.

■

# बडोदे साहित्यसंमेलनांतील भाषाविचार

**वैखरी वैद्य**

अखिल भारतीय मराठी साहित्यसंमेलनाच्या बरोबरीने आज महाराष्ट्रात अनेक विभागांतर्गत, प्रांतांतर्गत म्हणजे बडोदे, गोवा, मराठवाडा, कोकण महाराष्ट्र साहित्यसंमेलन इत्यादी साहित्यसंमेलने मोठ्या हिरीरीने भरत आहेत. या संमेलनाचे मुख्य आकर्षण असते ते म्हणजे अध्यक्षीय भाषण. बडोदे साहित्यसंमेलनातील भाषणेही याला अपवाद नाहीत.

१९३१पासून अव्याहत चालू असलेल्या या संमेलनांतील प्रत्येक अध्यक्षीय भाषण म्हणजे मराठी साहित्यविश्वाला मिळालेली एक देणगीच आहे. प्र०के० अत्रे, ना०सी० फडके, कुसुमावती देशपांडे, विजया राजाध्यक्ष, अनंत काणेकर, पु०य० देशपांडे, विजय तेंडुलकर, भालचंद्र नेमाडे यांसारख्या अनेक नामवंत साहित्यिक विचारवंतांनी या व्यासपीठावर हजेरी लावली आहे. त्यामुळे या प्रत्येक भाषणाला कमीअधिक प्रमाणात साहित्यिक मूल्य आहेच. या अध्यक्षीय भाषणाची मौलिकता लक्षात घेऊनच डॉ० द०दि० पुंडे व गणेश अग्निहोत्री यांनी 'सयाजीनगरीतील साहित्यविचार'(स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे) या द्विखंडात्मक ग्रंथातून अध्यक्षीय भाषणांचे संपादन केले आहे.

अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन ज्याप्रमाणे मराठी भाषेच्या रक्षणाच्या हेतूतून निर्माण झाले, त्याचप्रमाणे बडोदे संमेलनही मराठी भाषेचे संवर्धन हाच हेतू डोळ्यासमोर ठेवते. याशिवाय मराठी भाषक एकत्र येण्यासाठीही असे सोहळे उपकारक ठरत असतात. लोकांना संघटित करणारी, आपुलकीने भारून टाकणारी शक्ती म्हणजे भाषा. या भाषेचे संगोपन, संवर्धन करून भाषेला प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यासाठी अशा संमेलनांची गरज असते. त्याचप्रमाणे मराठी बोलणाऱ्या समाजाला एकत्रित आणून त्यांचे त्याचप्रमाणे मराठी भाषेसंबंधीचे प्रश्न मांडण्यासाठीही अशा संमेलनांचा उपयोग होत असतो. बडोद्यातील व्यासपीठावरून अशा काही महत्त्वाच्या विषयावर चर्चा झालेली दिसते.

आज भाषेतही एकप्रकारची विषमता आढळते. पुण्याकडची भाषा म्हणजे श्रेष्ठ अशी भावना निर्माण होताना दिसते. त्याचप्रमाणेच शिक्षितांची भाषा शुद्ध,

अशिक्षितांची भाषा अशुद्ध असाही वर्णभेद रूढ होताना दिसतो. अशा विचारांना वेळीच आळा घालणे जरुरीचे आहे. भाषेत प्रमाणभाषेची गरज असली तरी बोलीभाषेचे सौंदर्य व महत्त्व दुर्लक्षित करता येणार नाही. यासाठी सर्व स्तरांवरील लेखन आपापल्या बोलीभाषेतून, साहित्यातून यावे. भाषेने लोकजीवनाच्या गाभ्यापर्यंत पोचावे. भाषेने बहुजन समाजापर्यंत जावे, त्यांचे प्रश्न, समस्या व भावना पुरेशा ताकदीने समजून घ्याव्यात व बहुजन समाजाच्या बोलीनेही आपल्या सामर्थ्याने मराठी साहित्यातून व्यक्त व्हावे. भाषेच्या सर्वांगीण विकासासाठी हे आवश्यक आहे. भाषेत बोलीभाषेतील नव-नवीन शब्द जरूर यावेत. त्याचे मनापासून स्वागत करणे गरजेचे आहे. लेखनपद्धती सोपी करण्यापेक्षा ती बिनचूक करण्याकडे भर द्यावा. यासाठी औपचारिक व अनौपचारिक दोन्हीही भाषाशैलींचा वापर करावा. अनौपचारिक भाषाशैलीला अगदीच मारून टाकू नये, असा आधुनिक भाषाविज्ञानातील महत्त्वाचा विचार या व्यासपीठावरून स्फुट रूपात व्यक्त झालेला आहे. येथे सहज 'समाज़', 'समाज' किंवा 'महाराज़', 'महाराज' ही उदाहरणे आठवतात त्याचप्रमाणे 'तो पेन', 'ते पेन', 'ती पेन', 'तो लाईट', 'ती लाईट' अशी भिन्नलिंगी रूपे आठवतात. ही सगळी मराठी भाषेने स्वीकारली आहेत. मुळात मराठी भाषेचे रूप हे संमिश्र भाषा (creol) असे आहे. बोलींचे काही शब्द किंवा वाक्प्रचार स्वीकारायला काहीच हरकत नसावी. 'भाषा जितकी कृत्रिम व पंडिती बनवाल तितकी ती बहुजन समाजापासून दूर जाईल; इतकेच नव्हे तर मूळच्या निकोप प्रकृतीलाही मुकेल' असा इशारा श्री०के० क्षीरसागरांनी दिला आहे. ज्याप्रमाणे संस्कृती ही विशिष्ट वर्गाची, स्तराची किंवा प्रांताची मक्तेदारी नाही त्याप्रमाणे भाषेबाबतही म्हणता येईल. मात्र भाषेत नवीन शब्द घडविताना किंवा स्वीकारताना हे शब्द आंधळेपणाने किंवा अज्ञानाने स्वीकारले जाऊ नयेत तर स्वभाषेच्या प्रकृतीचे सूक्ष्म ज्ञान, ज्या परभाषेतून शब्द घ्यायचे तिचे सूक्ष्म ज्ञान, भाषकांना सुबोध अर्थ प्रतीत करून देण्याची तळमळ व भाषाप्रभुत्व इत्यादी गुण असणे आवश्यक आहे. उदाहरणार्थ, आचार्य अत्रे, श्री०म० माटे, विनोबा यांची भाषाशैली.

भाषेतील विद्रूपता व बोजडता केवळ परकीय शब्दांमुळे आली आहे असे नाही, तर मराठी भाषेच्या चुकीच्या रचनेमुळेही ती येते आणि तीच अधिक चिंताजनक आहे. भाषेत नव्याने शिरलेले अशुद्ध व बोजड शब्द शब्दकोशाच्या साहाय्याने काढून टाकता येतात. पण रचनेच्या दृष्टीने भाषेचा ऱ्हास झाला तर तिची सुधारणा करणे अशक्य आहे. भाषेत किती शब्द आहेत यापेक्षा भाषेच्या प्रकृतीशी जुळणारे लोकव्यवहारातील निगडित असे शब्द असणे महत्त्वाचे असते. यासाठी कोशवाङ्मय जतन करणे व अद्ययावत करणे, त्याचे महत्त्व ओळखणे गरजेचे असते.

‘निकोप गद्य व स्वाभाविक सुगम शब्दसंग्रह या भाषेच्या अगदी प्राथमिक गरजा आहेत. राष्ट्रैक्याच्या विशाल ध्येयाखातरही अशा दोन अमोल ठेव्यांवर कोणत्याही आधुनिक देशभाषेने पाणी सोडू नये’ अशी अपेक्षा याप्रसंगी श्री०के० क्षीरसागरांनी व्यक्त केली आहे.

बडोद्याच्या व्यासपीठावरून मातृभाषा व इतर भाषा यांतील संबंध पाहिला जाणे याला विशिष्ट अर्थ आहे. बडोदे हे गुजरात प्रांतातील शहर. १९५६ मध्ये भाषावार प्रांतरचना झाल्यामुळे अशा शहरातील मराठी भाषकांच्या मुलांच्या शिक्षणाच्या माध्यमाचा प्रश्न ऐरणीवर आला. मराठी ही मातृभाषा, गुजराती व्यवहारभाषा, हिंदी राष्ट्रभाषा व इंग्रजी ही जागतिक भाषा. यामुळे या समाजावर बहुभाषिकत्वाचा ताण पडू लागलेला दिसतो. वि०द० घाटे यांनी तो प्रामुख्याने मांडला याचे कारण घाट्यांचे वास्तव्य दीर्घकाळ गुजरातेत होते. त्याचप्रमाणे ते शिक्षणतज्ज्ञ म्हणूनही काम करीत होते. त्यामुळे त्यांना या प्रश्नाचे महत्त्व वाटले. त्यांच्या विचारांना स्वानुभवाचे अधिष्ठान आहे. दीर्घकाळ विविध प्रांतांत भटकंती करून त्यांनी भाषेचा प्रश्न अभ्यासलेला आहे. ते म्हणतात, ‘आपण ज्या प्रांतात राहतो ती मुलांना येणारच; पण मातृभाषा टिकली पाहिजे यासाठी धडपड करण्याची आवश्यकता आहे. भोवतालचा समाज, शासनाचा विचार करून आपली परंपरा, स्थान व गरजा यांच्या समन्वयातून भाषिक निर्णय घ्यावा. भाषिक अल्पसंख्याकांचे जीवन दुहेरी असते. घरात एक व परिसराची एक भाषा अशा दुहेरी पद्धतीने ते भाषिक व्यवहार करीत असतात...’ अनुभवाची भाषा ही शिक्षणाची भाषा असावी हे उघड असले तरी अशा बहुभाषिक मुलांबाबत ते सुचवतात की, प्राथमिक व माध्यमिक शिक्षण मराठीतून द्यावे; पण गुजरातीलाही द्वितीय भाषा म्हणून स्थान द्यावे. त्यांच्या अभ्यासक्रमाचा व्याप कमी असावा व खोली अधिक असावी अशीही अपेक्षा ते व्यक्त करतात.

भालचंद्र नेमाडे याबाबत म्हणतात, ‘परभाषेतून शिक्षण घेताना नकळत भावशून्य व्यवहार करण्याची भाषिक सवय जडते आणि दोन किंवा तीन संकेतव्यवस्थांचे ओझे निखळ आधुनिक ठरण्यासाठी वाहण्याची सगळ्या समाजालाच पशुतुल्य सवय लागते... अर्थव्यक्तीची अचूकता व तरलता मातृभाषेतूनच शक्य असते; कारण मातृभाषेवर उत्तम प्रभुत्व आल्यानेच इतर भाषांवर प्रभुत्व मिळणे सहज व सोपे होते.’ नेमाडे पुढे म्हणतात, ‘आपला तात्पुरता विकास करण्यासाठी इंग्रजी वापरणारे हेही विसरतात की द्विभाषिकत्वात दोन्ही भाषांच्या अपुऱ्या अर्थव्यवस्था कार्य करीत असतात. कोणत्या मर्यादेनंतर परभाषेचा वापर करावा याची सामाजिक नैतिकता पाळली नाही तर परभाषा नेहमीच स्वभाषेवर आक्रमण करायला सज्ज असते.’

नेमाडे यांनी अतिशय महत्त्वाचा भाषिक सिद्धान्त याप्रसंगी मांडला आहे. विशिष्ट समाज हा ज्यावेळी द्वि किंवा बहुभाषिक असतो त्या वेळी त्याची विचारप्रक्रिया एका भाषेतून व तिचा आविष्कार दुसऱ्याच भाषेतून होत असतो, त्यामुळे या समाजाची स्थिती 'अत्र ना परत्र' अशी होते. कोणत्याही एका भाषेत तो समर्थ आविष्कार करू शकत नाही. भाषिक दृष्ट्या तो निम्न स्तरावरच राहतो. जिथे जिथे एकभाषिक समाज आहे तिथे तिथे उत्तम साहित्यकृती निर्माण होऊ शकतात, त्याचे कारणही हेच आहे. महाराष्ट्रात एकभाषिक समाज असताना संतवाङ्मयातून उत्कृष्ट साहित्यनिर्मिती झालेली दिसून येते. पुढे उर्दू, फारसी, इंग्रजी इत्यादी भाषांच्या संपर्कात आल्यामुळे मराठीतील साहित्याविष्काराला ओहोटी लागली.

'जगातील लोकसंख्येच्या दृष्टीने दुसऱ्या क्रमांकाचा देश असूनही भारतातील एकही भाषा जागतिक योग्यतेची होणार नाही अशी भाषिक नीचमूल्यता आपल्या भाषांना प्राप्त झाली आहे,' असे नेमाडे म्हणतात त्याचे कारणही हेच आहे.

विश्वास पाटील यांनी इंग्रजी भाषेला संकट न समजता आव्हान समजावे असे म्हटले आहे. आविष्काराच्या दृष्टीने इंग्रजीचे आक्रमण हे संकट वाटत असले तरी इंग्रजी भाषेच्या संपर्काने नवीन व अद्ययावत ज्ञान व इंग्रजी साहित्याची ओळख झाली हा फायदाही अमान्य करता येण्याजोगा नाही.

इंग्रजी साहित्याच्या परिचयाने मराठी साहित्याला एक वेगळे वळण मिळाले तेव्हापासून भाषांतराची आवश्यकता वाटू लागली. पहिल्या संमेलनाचे अध्यक्ष न० चिं० केळकर यांनी अशा प्रांतिक संमेलनांमुळे भाषांतरित वाङ्मयाला चालना मिळावी अशा स्वरूपाचे विचार मांडले आहेत.

यापुढील काळातही अनेक विचारवंतांनी भाषांतराची आवश्यकता स्पष्ट करताना काही कारणे सांगितली आहेत. त्यामध्ये मराठी भाषेला वैभव येण्यासाठी, प्रतिष्ठा प्राप्त होण्यासाठी, जगातील उत्कृष्ट साहित्यकृतींचा आस्वाद घेता येण्यासाठी, राष्ट्रीय एकात्मता साधण्यासाठी, संस्कृतीच्या संरक्षण व संवर्धनासाठी व भिन्न भाषिक समाजांना एकत्रित आणण्यासाठी भाषांतराची आवश्यकता प्रामुख्याने सांगितली गेली. वसंत बापटांनी त्याही पुढे जाऊन भाषांतराची गरज सांगताना वैश्विकतेला आवाहन केले आहे. ते म्हणतात, 'भारतीय साहित्य एक आहे; पण ते अनेक भाषांत लिहिले जाते अशा वेळी वेगळेपण ठेवूनही एकरूपता कशी टिकवायची हा एक मोठाच प्रश्न आहे. आपले भारतीयत्व टिकवून आपली विश्वात्मकता ओळखण्यासाठी भाषांतराची आवश्यकता आहे, कारण साहित्यातून मांडलेल्या सार्वत्रिक, सार्वकालिक मूल्यांमुळे अनेक भाषांतून साहित्य लिहिले जाऊनही त्यात एकात्मता दिसते.'

मानवी स्वभाव, प्रवृत्ती, भावना या कोठेही गेले तरी सारख्याच असणार. मात्र प्रदेश, संस्कृती, परंपरा यांनुसार त्यांचा आविष्कार बदलत असतो. मानवी मूल्ये सार्वत्रिक, सार्वकालिक स्वरूपाची असतात. ती ज्या साहित्यातून दिसतात ते 'श्रेष्ठ' साहित्य ठरते, वैश्विकतेला ते साहाय्यभूत ठरत असते.

१९३१ सालापासून नियमितपणे भरवल्या जाणाऱ्या या संमेलनांतील अध्यक्षीय भाषणांत भाषाशैलीची विविध रूपे आढळून येतात. आचार्य अत्रे यांची महाराष्ट्रात बुद्धिमत्तेची परंपरा खंडित झाली नाही हे बजावणारी घणाघाती शैली, चिं०वि० जोशी, मिरासदार, बाळ गाडगीळ यांनी नेहमीची विनोदी लेखक म्हणून असलेली प्रतिमा पुसून गांभीर्याने विनोदी साहित्याचा केलेला विचार, नेमाडे यांनी अतिशय संयमितपणे केलेले भाषण, शंकर वैद्य व विजया राजाध्यक्ष यांनी प्रबंधवजा दीर्घ स्वरूपाची केलेली भाषणे ही त्याची उदाहरणे सांगता येतील.

मराठी भाषेला प्रतिष्ठा मिळण्याच्या दृष्टिकोनातून राजकीय, सामाजिक, शैक्षणिक व प्रसारमाध्यमांच्या क्षेत्रांत मराठीला प्राधान्य देण्याची आवश्यकता या व्यासपीठावरून ठामपणे मांडली गेली.

या सगळ्या विचारांमुळे बडोदे साहित्यसंमेलनातील भाषणे किती मोलाची आहेत हे लक्षात येते. मराठी भाषेसंबंधी अनेक महत्त्वाचे विचार मांडले गेले. भाषिक प्रश्नांना वाचा फोडण्यात आली. परभाषेच्या संदर्भात मराठीचे स्थान तपासले गेले. बहुजन समाजाच्या बोलीभाषेचे व विविध सामाजिक स्तरांवरील मराठी भाषेला प्रमाणभाषेने स्वीकारावे असे विचार मांडले गेले. त्यामुळेच असे म्हणावेसे वाटते की 'वाङ्मयपरिषद, बडोदे' या प्रांतिक संस्थेने ही संमेलने आयोजित केली असली तरी त्यांचा आवाका हा बडोद्यापुरताच मर्यादित नाही. मराठी साहित्यविश्वाला व भाषाविचाराला भरीव योगदान या संमेलनामुळे मिळाले आहे.

■

18/2, **राधाकृष्ण बंगला, महालक्ष्मी सोसायटी, गल्ली क्र.** 4, **विठ्ठलनगर, सिंहगड मार्ग, पुणे** 411 051.

**दूरभाष :** (020) - 2434 8688 **भ्रमणभाष :** 094235 80145.

# धुळे जिल्ह्यातील दलित स्त्रियांच्या ओवीगीतांतील ‘पती’ची प्रतिमा

प्रकाश भामरे

लोकवाङ्मय हे लोकसाहित्याचे एक प्रमुख अंग असून त्यात परंपरेने चालत आलेल्या लोकजीवनाच्या ‘शाब्द’ आविष्कारांचा समावेश होतो. लोकजीवनात रूढ असलेली लोकगीते, लोककथा, लोकोक्ती इत्यादींचा समावेश लोकवाङ्मयात होतो. लोकवाङ्मयातील ‘लोकगीते’ हा अत्यंत महत्त्वपूर्ण भाग आहे.

धुळे जिल्ह्यातील दलित स्त्रियांची ‘ओवीगीते’ म्हणजे पूर्वाश्रमीच्या ‘महार’ स्त्रियांची ओवीगीते जिवंत वाटतात. कारण ती ‘महार’ समाजाच्या लोकजीवनातून आलेली आहेत. त्यातून दलित-महार समाजाचे परंपरागत लोकजीवन व्यक्त होताना आढळते. ‘ओवीगीत’ हा दलित स्त्रियांच्या लोकगीतांतील प्रभावी आणि भावसंपन्न लोकगीत प्रकार आहे. विविध प्रकारचा आशय व्यक्त करणाऱ्या दलित स्त्रियांच्या ‘ओव्या’ आशय व अभिव्यक्तीच्या दृष्टीने वैशिष्ट्यपूर्ण आहेत. दलित स्त्रीजीवनातील अनेक घटना, प्रसंग आणि नातेसंबंधातील भाव-भावनांची एक चित्रमालिकाच त्यातून दृष्टीस पडते. आंतरीच्या उमाळ्यातून या ओव्यांची निर्मिती झालेली असल्यामुळे त्या भावस्पर्शी आहेत.

धुळे जिल्ह्यातील महार या दलित जातीतील स्त्रियांना परंपरेने उपेक्षित जीवन आणि श्रम-कष्टांची वेदना-दुःखे भोगावी लागलेली आहेत. ओवीचा जन्म जसा मनोभावातून होतो; तसाच तो कष्टकरी वेदनेचा दुःखार्त स्वरही असतो. त्यामुळेच दलित स्त्रियांच्या अनेक ओव्यांमधून ही वेदना ठसठसून बाहेर पडताना दिसते. स्त्री ज्या कुटुंबात राहते, नांदते किंवा जेथे लहानाची मोठी होते त्या कुटुंबातील अनेक नातेसंबंध तिच्याशी जोडले जातात. कौटुंबिक नात्यातील भावसंबंधाचे अत्यंत हळुवारपणे केलेले चित्रण हा या ओव्यांचा एक महत्त्वाचा विशेष आहे. दलित-स्त्रियांच्या म्हणजेच महार स्त्रियांच्या ओव्यांमधून पती-पत्नी, आई-वडील, बहीण-भाऊ, सासू-सासरे, नणंद-जावा, लेक-जावई इत्यादी कौटुंबिक नात्यांतील भावबंध उलगडून दाखविण्याचा प्रयत्न केलेला आढळतो.

प्रस्तुत लेखात दलित स्त्रियांचे आपल्या पतीविषयीचे भावबंध उलगडून दाखविलेले

आहेत. या ओवीगीतांतून पतीची म्हणजेच नवऱ्याची 'प्रतिमा' कशा स्वरूपात आलेली आहे, याचा शोध घेण्याचा प्रयत्न केलेला आहे.

नवरा-बायको किंवा पती-पत्नी हे परंपरेत सर्वांत जवळचे व विश्वासाचे नाते मानले गेलेले आहे. सुख-दु:खाच्या प्रसंगी इतर नात्यांपेक्षा नवरा-बायकोला एकमेकांचा आधार मानसिक बळ पुरविताना दिसतो. नवऱ्याविना ग्रामीण दलित स्त्रीचे जगणे म्हणजे वाळवंटातला प्रवास होय. नवऱ्याच्या अस्तित्वामुळे एकप्रकारचे वजन संबंधित स्त्रीला प्राप्त झालेले आढळते. अशा या नात्याविषयी दलित स्त्रियांनी महारी अहिराणी बोलीत विपुल प्रमाणात ओव्या रचलेल्या आढळतात. महार स्त्री नवऱ्याचा उल्लेख ओवीगीतांतून 'राम' या शब्दाने करताना आढळते. ज्या स्त्रीच्या आयुष्यात 'राम' नाही तिच्या जगण्यात खरोखरच 'राम' उरत नाही. म्हणून पतीविषयीचे आत्यंतिक प्रेम व्यक्त करणाऱ्या ओव्या विपुल प्रमाणात आढळतात.

''राम राम करू, मन्हा राम कोठे गया
एक दिन सांगा तठे, मयना व्हई गया''
''गया कोन गाव, मन्ही नथना आकडा
अजून उना कसा नाही, दिवाल टोपीना वाकडा''
''गया कोठे सईबाई, मन्हा कुकूना वं धनी
सासू टाकी बोलनी, मन्हा रामनी याद उनी''
''गया कोन गाव, मन्हा जीवना सजन
सजनबिगर लागे कडू, माले पाची पकवान''

नवरा बाहेरगावी गेल्यानंतर लवकर माघारी कसा आला नाही; ही हुरहूर या स्त्रीला लागून राहिलेली आहे. त्याच्या लवकर न येण्याची चिंता तिला सतावत आहे. एक दिवस सांगून महिना उलटला तरी स्वारी परत कशी आली नाही; ही काळजी तिला वाटते आहे. नवऱ्याला 'नथना आकडा' ही उपमा अतिशय समर्पक आहे. आकड्याशिवाय 'नथ' नाकात राहू शकत नाही तसे पतीशिवाय पत्नीचे अस्तित्व शून्य ठरते. आकडा आहे म्हणून नथ आहे. तसे पती आहे म्हणून पत्नीला कुटुंबात मान आहे. हे सूचन प्रस्तुत उपमेतून होते. नथ हे सौभाग्याचे प्रतीक आहे, हे या ठिकाणी लक्षात यावे.

दलित स्त्री सासर सोडून काही दिवसांसाठी माहेरी जायला निघते तेव्हा ही स्त्री आपल्या सासूला विनवते :

''सासू-आत्याबाई, मन्हा पदरले ओवा
मी चालनू माहेरले, मन्हा रामले जीव लावा''

''सासू आत्याबाई, मन्हा पदरले गाठी
मन्हा भरतार बिगर माले, सूनं-सूनं वाटी''

प्रस्तुत आव्यांमध्ये ही स्त्री आपल्या सासूला म्हणते, माझ्या प्रिय पतिराजाकडे लक्ष असू द्या, त्यांच्या खाण्या-पिण्याची आबाळ होणार नाही याची काळजी घ्या. ग्रामीण दलित स्त्रिया पदरात ओवा बांधत असत. पूर्वी 'ओवा' हा पदार्थ जसा कायम सोबत करायचा तसे नवऱ्याचे स्थान असते. त्याच्याशिवाय जगणे किंवा त्याचा वियोग सहन करणे हे तिला असह्य होऊन बसते. म्हणून माझ्या पदराच्या ओव्याला जीव लावा असे ती सासूला पुन्हा - पुन्हा सांगते आहे. मला त्यांच्याशिवाय करमणार नसले तरी मला माहेरी जाणेही गरजेचे आहे. नवऱ्याशिवाय मला माहेरचे घर खाली-खाली वाटेल म्हणजेच मला रितेपण जाणवेल अशी प्रीतिभावना उपरोक्त ओवीतून व्यक्त होते :

''माईना मयामान, एक जामन्या चार फोडी
मन्हा संसारमा रामले, मन्ही भलती गोडी''
''राम राम करू, राम लयना रंगीत आयनां
रूपले मन्हा भूलना, घर सोडी वं जायेना''
''भरतारनी कई खूण, डावा डोया घाई
मन उडनं सईबाई, मन्हं कामवर थाई''

माझ्यावर माझ्या नवऱ्याचे किती जिवापाड प्रेम आहे; याचे दर्शन प्रस्तुत ओव्यांमधून घडते. नवरा-बायको समजुतदारपणाने वागले तर त्यांचे एकमेकांविषयीचे प्रेम सारखे वृद्धिंगत होत राहते. सहवास व साहचर्य यांच्यातून त्यांचे परस्परांवरील प्रेम अधिक दृढ होत राहते. माझ्या संसारात माझ्या पतीला माझ्याविषयी फारच गोडी आहे. त्यांनी हळूच डोळ्याने खूण केल्यावर मी अस्वस्थ होते व माझे कामावरचे चित्त उडते. आणि केव्हा त्यांच्या सहवासात जाऊ नि केव्हा नाही अशी जीवाची तडफड होते. असा हा प्रिय सखा माझ्या रूपावर इतका भाळला आहे की, घर सोडून जायला धजत नाही. अशा नाजुक भाव-भावनांचे प्रकटन उपरोक्त ओव्यांतून अगदी सहज होते. निर्व्याज, निखळ आणि नैसर्गिक प्रेमाचा दलित स्त्री किती सार्थ व भावसाक्षर विचार मांडून जाते; हे आपण ध्यानात घेतले पाहिजे. त्या दोघांनाही एकमेकांचा वियोग अस्वस्थ करतो. त्यातून दोघेही प्रणय-व्याकूळ अवस्था अनुभवताना दिसतात. एक स्त्री आपल्या सुखी संसाराचे गणित मांडताना म्हणते :

''रामना राजमा सुख, भोगी लेवं नारी
कोना देर-जेठ, खावानी मारामारी''

''भरतारना बये, नार मानेना वं कोनले
घर कडीपाट, हात पुराये आभायले''
''भरतारना राजमा, खादं शिकावरनं दही
आंडोर-वहूना राजमा, ताक पानीनी सत्ता नही''
''देर-जेठमा संसार, कया मी बानीना
हयात कपायनं कुकू, दारे हाऊद पानीना''
''भरतारनं राज, जसं रांजननं पानी
दोनी हाते उपसू झिरा, माले वरजेना कोनी''
''राजमानं राज, नही लागे रामना राजले
ऊन पडी गये, मन्हा खाटना बाजूले''

सांसारिक जीवनात पत्नीच्या दृष्टीने पतीचे 'असणे' किती महत्त्वपूर्ण आहे, याचे सूचन प्रस्तुत ओव्यांमधून होते. जोपर्यंत नवऱ्याचे अस्तित्व किंवा नवऱ्याची सत्ता कुटुंबावर चालते; तोपर्यंत संबंधित स्त्रीला सुखाचे दिवस दिसतात. पतीचे निधन झाल्यानंतर मात्र दीर-जेठ, सासू-सासरे यांच्या राज्यात खाण्या-पिण्यापासून आपपरभाव सुरू होतो. 'ऊन पडी गये, मन्हा खाटना बाजूले' ही ओळ पतीनिधनाचे सूचन करते. म्हणून पती हयात आहे तोपर्यंत सुखप्राप्ती असते. असा आशय उपरोक्त ओव्यांमधून विविध उपमा-प्रतिमांनी व्यक्त होताना आढळतो. पतीमुळेच पत्नीला वैभवाचे दिवस असतात. कपाळाचे कुंकू जोपर्यंत शाबूत आहे; तोपर्यंत कसलीही काळजी करण्याचे कारण नाही असे ही स्त्री म्हणते. कडीपाटचे घर, दारात पाण्याचा हौद, शिंक्यावरचे दही, हे शब्दबंध वैभवाची प्रतीके म्हणून अवतरतात.

वैवाहिक जीवनात सर्वात जवळचे नाते वा जीवा-भावाचे नाते म्हणजे पती-पत्नीचे नाते असते. म्हणून त्याच्या रंगरूपाची चिकित्सा न करता त्याच्या गुणांची कदर केली पाहिजे, असे म्हणताना एक स्त्री ओवीतून सांगते,-

''भोया मन्हा राम, लोकेसनी कया पिसा
आयका सयानारी, माना मी देव जसा''
''भरतारनी सेवा, कोन करस पतिवरता
आंघोयले पानी, सूर्य वर येता''
''राम राम करू, राम काया का गोरा
रेसमना धोतरजोडा, राम सिंगारमा येडा''
''गोरं मन्हं आंगं, लावू कितली लाल माटी
हाई आयबानं देनं, लयनू 'राम'ना साठी''

''नको देखू सईबाई, मन्हा आंगना सांधा-बांधा
मन्हा 'राम' ना राजमा, खादा तूप रवाना सांजा''

ग्रामीण दलित स्त्रीच्या दृष्टीने पतीचे स्थान हे तिच्या बाबतीत देवस्वरूप असते. तो रंगरूपाने कसाही असला, स्वभावाने भोळसट असला तरी तो माझा नवरा आहे; अशा प्रकारची भावना उपरोक्त ओव्यांमधून व्यक्त होते. वेडा, भोळा, काळा कसाही असो मी त्याच्या बाह्यरूपाकडे न पाहता त्याच्या मनातले भाव जाणून आहे. म्हणून हे शरीर आणि मन मी त्याला पूर्ण समर्पित केले आहे. ही पवित्र भावना पती-पत्नीच्या एकनिष्ठतेला अधोरेखित करते. पतीला देवस्वरूप मानणे, त्याला भल्या पहाटे आंघोळीसाठी पाणी देणे, त्याला शरीर व मन समर्पित करणे, या सर्व गोष्टींतून पतिव्रता स्त्रीची लक्षणे सूचित होतात.

धुळे जिल्ह्यातील दलित-महार जातीतील स्त्रीगीतांमधून जसे व्यक्तिगत भाव प्रकट होतात; तसे त्यांचे सामाजिक लोकजीवनही प्रकट होताना आढळते. जसे -

''राम राम करू, धाबे गिलकाना येल
नदारीना संसार मन्हा, राम खाये गुयतेल''

''राम राम करू मन्हा पदरले गाठी
रामनी आईट मोठी, हाते गावनी वं काठी''

''राम राम करू, राम बठे चावडीवर
रामनी कया न्याव, गोट गई देवडीवर''

''राम राम करू, राम करे कोतवाली
रामबिगर पाटीलले, गाव वाटे खाली-खाली''

उपरोक्त ओव्यांमधून गावकामगार महाराची पत्नी तिच्या पतीविषयी, त्याच्या गावातील मानाविषयी, स्थानाविषयी बोलत आहे. पूर्वीच्या गावगाड्यात-महार गावकामगाराला विशिष्ट स्थान असे. 'गावाची काठी' म्हणजे वतनदारी त्याच्याकडे असणे कुटुंबाच्या दृष्टीने अभिमानाची बाब होती. 'गावकाठी' ज्या महार कामगाराकडे असे; त्याच्या पत्नीचे मनोगत वरील ओवीतून व्यक्त होते. 'महाराची चावडी आणि पाटलाची देवडी' अशी म्हण ग्रामीण भागात प्रचलित आहे. चावडीवर महाराने न्याय केला त्याची वार्ता पाटलाच्या कानांवर गेली; व गावपाटलाने त्याच्या निरपेक्ष न्याय पद्धतीमुळे त्याची प्रशंसा केली, असा प्रस्तुत ओवीचा आशय आहे. 'कोतवाल' ही व्यक्ती पूर्वीपासून महार जातीतीलच आढळते. आज कोतवाल तलाठ्याच्या हाताखाली काम करताना दिसतो. पूर्वीच्या काळी कोतवाल गावगाड्यातील महत्त्वाचा घटक मानला जाई. कोतवालाशिवाय गावपाटलाचे पान हालत नसे. कारण कोतवालाला गावाची

खडान्-खडा माहिती असे. त्याची गैरहजेरी गावपाटलाला विशेष जाणवत असे. या त्याच्या महत्त्वामुळे त्याच्या पत्नीच्या तोंडून ही ओवी आली असावी. 'गुयतेल' म्हणजे तेल टाकलेले गुळाचे पाणी हा पदार्थ महार जातीतील विशेषतः गरीब महार कुटुंबातील आवडीचा खाद्य पदार्थ आहे. त्याचेही अवतरण वरील ओवीत झालेले आहे. अशा प्रकारे दलित-महार जातीच्या लोकजीवनाचे प्रतिबिंब स्त्रियांच्या ओव्यांमध्ये उमटलेले आढळते.

आणखी काही पतीविषयक ओव्यांमधून नवरा-बायकोच्या प्रेमसंबंधाचे अंकन झालेले आढळते :

''भरतारना जोगे, बसानी काय लाज
चंदन-सेवगानी साया, जशी गयरेबाज''
''भरतार मारे हाका, कोठे गई घरवाली
रानीबिगर माले, घर वाटे खाली-खाली''
''भरतार मारे हाका कोठे गई रंभा
तिना पदरे लवंगा, व्हयना ईडाना खोयंबा''
''रुसना भरतार, समजाडू मी त्याले कशी
समजता समजेना, व्हयनू येडीपिसी''

उपरोक्त ओवीगीतांमधून दलित स्त्री आपल्या प्रिय 'भरतार' म्हणजेच पतीविषयीच्या प्रेमाचे प्रकटन करताना दिसते. पतीचा सहवास म्हणजे चंदनवृक्षाची सावली आहे. मी घरात नसणे ही कल्पनाच माझ्या पतीला अस्वस्थ करते. अशा या प्रिय सख्याला राग आला तर माझे मन त्याची समजूत काढता-काढता वेडेपिसे होते. अशा हृद्य भावना वरील ओव्यांतून अगदी सहज व्यक्त होताना आढळतात. या ओव्यांमधील पत्नी, पतीच्या प्रेमामुळे गरिबी, सासुरवास वगैरे गोष्टी विसरून जाते. यातून पति-पत्नीच्या नातेसंबंधातील आतुरता, एकनिष्ठता ओसंडून वाहताना दिसते.

असे असले तरी काहींच्या सुखी संसाराला दृष्ट लागते व त्यांचा सुखी-संसार संशयाच्या भुतामुळे उद्ध्वस्ततेच्या मार्गावर जातो. काही नवरे हे संशयी स्वभावाचे असतात. त्यांच्या संशयी स्वभावामुळे निरपराध स्त्रियांच्या संसाराला ग्रहण लागते. लोकसमूहात चारित्र्यसंपन्न व शीलवान स्त्रीच्या गौरवाची परंपरा राहिलेली आहे. आपले शील जपणाऱ्या प्रांजळ पतिव्रता स्त्रीची भावना काही ओव्यांमधून व्यक्त होताना दिसते. जसे,-

''राम राम करू, राम उसाना सरप
आसडी मारी थाप, त्याना मनमा कपट''

''माईना मयामा, एक निंबून्या चार फोडी
आस्तुरीनी जात येडी, पुरूसले माया थोडी''
''आव सयाबाई, पराई पुरुस भेटना वाटे
भरतार देखे दूरथीन त्याना मनमा पाप दाटे''
''राम राम करू, रामना मनमा पाप
सीतानी कये दिव्य, तठे आपली काय गत''

प्रस्तुत ओवीगीतांमधून संशयी, मनात कपट असलेल्या नवऱ्याच्या स्वभावाविषयी आकलन होते. पत्नीने पतीला कितीही जीव लावला तरी तो त्याच्या वळणावरच जातो. आपल्या पत्नीविषयी त्याच्या मनात सतत संशयाचे ढग जमा होत राहतात. पती म्हणजे उशाजवळचा साप आहे. त्याच्यावर पूर्ण विश्वास ठेवणे धोक्याचे आहे असे सूचन वरील ओवीतून होते. ग्रामीण भागात आजही स्त्रियांनी परपुरुषांशी बोलणे निषिद्ध मानले जाते. ते दोघे निरागसपणे बोलत असले तरी संबंधित स्त्रीच्या पतीच्या मनात संशय निर्माण होतोच असे प्रस्तुत ओवीतून कळते. म्हणून पुरुषाच्या जातीला माया, प्रेम हे थोडेच असते अशा निर्णयाप्रत ही स्त्री आलेली आहे. कारण 'जिथे रामाने सीतेवर संशय घेतला तिथे आपली काय गत' असे ती शेवटी म्हणते. अशा या वेगळ्या भाव-भावनांचे चित्रणही दलित स्त्रियांच्या ओवीगीतांतून आलेले आढळते. एकंदरीत दलित स्त्रियांच्या ओवीगीतांतील पतीची प्रतिमा उजवी असली तरी काही ओव्यांमधून त्याचे वेगळे रूपही प्रकट झालेले आढळते.

ओव्यांची प्राप्ती :

(१) श्रीमती लक्ष्मीबाई अर्जुन भामरे, रा० कापडणे, जि० धुळे,

(२) श्रीमती येसाबाई हिरचंद भामरे, रा० कापडणे, जि० धुळे. ■

**मराठी विभाग प्रमुख, जी०टी० पाटील महाविद्यालय, नंदुरबार.**

**भ्रमणभाष :** 098222 94255

**मराठी विरुद्ध मराठी**

महाराष्ट्राच्या राजधानीत मराठीसाठी लढणारी माणसे, ज्यांच्याशी लढतायत तीही मराठीच माणसे आहेत! महापालिका, राज्य सरकार, इथली सत्ताधारी माणसे आणि प्रशासन मराठीच आहे. तरीही 'मराठी पाटी लावा' म्हणून जर हिंसक आंदोलन करावे लागत असेल, तर इतरांनी मराठी भाषा, मराठी अस्मिता आणि मराठी संस्कृतीला का महत्त्व द्यावे किंवा साधे लक्ष द्यावे?

**संजय पवार, दै० महाराष्ट्र टाइम्स, ९ मे ०६**

**प्रेषक : डॉ० मिलिंद मालशे**

# भारतातील काही 'मातृ'भाषा

**रमेशचंद्र पाटकर**

२००१ साली झालेल्या जनगणनेचा अहवाल अलीकडे प्रसिद्ध झाला आहे. त्यातील काही 'मातृ'भाषाविषयक आकडेवारी 'धक्कादायक' आहे.

अरेबिक ही मातृभाषा असणारे ५०,००० वर लोक भारतात आहेत यावर आपला विश्वास बसेल काय? अरेबिक ही आपली मातृभाषा आहे असे सांगणारे एकूण ५१,७२८ लोक भारतात आहे. जनगणनेच्या अहवालात दिलेल्या आकडेवारीनुसार त्यातील १८,००० लोक बिहार राज्यात, तर ८,५०० लोक उत्तर प्रदेश राज्यात आहेत. उरलेल्या राज्यांत अरेबिक बोलणारे कमीत कमी १००० लोक असतील. एवढ्या मोठ्या संख्येने अरब भारतात राहात असतील यावर विश्वास ठेवणे कठीण आहे! 'उच्चकुलीन' (elite) मुस्लिमांपैकी बरेचजण आपले पूर्वज 'अरब' होते असा अभिमानपूर्वक दावा करतात. अशाच लोकांनी अरेबिक ही आपली मातृभाषा असल्याची नोंद जनगणनेच्या वेळी करायला लावली असण्याची शक्यता आहे. १९९१ साली झालेल्या जनगणनेत जवळपास २२,००० लोकांनी आपली मातृभाषा अरेबिक असल्याची नोंद केली होती. याचा अर्थ अरेबिक मातृभाषा असणाऱ्या भारतीय नागरिकांची संख्या दहा वर्षांत दुपटीपेक्षा जास्त झाली आहे.

१२,००० लोकांची मातृभाषा पर्शियन असल्याचे २००१ च्या जनगणनेचा अहवाल सांगतो. पर्शियन मातृभाषा असलेल्या लोकांची जास्त संख्या पश्चिम बंगाल राज्यात आहे. झारखंड, महाराष्ट्र व बिहार या राज्यांतही पर्शियन भाषिक भारतीय नागरिक आहेत, असे या अहवालात नमूद केले आहे.

भारतात अंदाजे १,२०,००० ते २,००,००० तिबेटी विखुरले गेले आहेत. पण फक्त ८५,००० लोकांनी तिबेटी ही आपली मातृभाषा असल्याचे म्हटले आहे. हिमाचल प्रदेश राज्यातील 'धर्मशाळा' या भागात तिबेटी लोक जास्त संख्येने राहतात अशी आपली समजूत आहे. पण तिथे राहणाऱ्या तिबेटी लोकांपेक्षा दीडपट लोक कर्नाटक राज्यात राहतात.

२.३ लाख भारतीय नागरिकांनी आपली मातृभाषा इंग्रजी असल्याचे सांगितले

आहे. पण त्यात फारसे आश्चर्य वाटण्याचे कारण नाही; कारण महाराष्ट्र, तामिळनाडू, कर्नाटक आणि पश्चिम बंगाल या राज्यांत राहणाऱ्या अँग्लो-इंडियन लोकांची संख्या जवळपास तेवढीच भरते. या अँग्लो-इंडियन लोकांनी आपली मातृभाषा इंग्रजी असल्याचे सांगितलेले असावे.

२००१च्या जनगणनेच्या अहवालानुसार भारतात ११,०८६ पुश्तू भाषिक लोक आहेत. त्यापैकी जम्मू व काश्मीरमध्ये ७,३९५, दिल्लीत १,०६२, महाराष्ट्रात ८२०, हरियाणात ७२१ आणि हिमाचल प्रदेशात ३४७ लोक आहेत. अफगाणिस्तानमध्ये गेली काही वर्षे जी रणधुमाळी चालली आहे. त्यामुळे बऱ्याच अफगाणी लोकांनी भारतात स्थलांतर केले आणि वेगवेगळ्या राज्यांत आपले तंबू उभारले. अशा स्थलांतरित अफगाणी लोकांनी आपली मातृभाषा पुश्तू असल्याचे सांगितले असावे.

वर उल्लेखिलेल्या भाषा या परकीय आहेत. पण संस्कृत ही भारतीय भाषा आपली मातृभाषा असल्याची नोंद १४,१३५ भारतीयांनी केली आहे. त्यापैकी ७,०४८ जण उत्तर प्रदेशात, १,३४० लोक आंध्र प्रदेशात, ९८९ राजस्थानात, ८३० कर्नाटकात आणि ७५४ लोक बिहार राज्यात आहेत.

(**संदर्भ :** १९ एप्रिल २००८ च्या 'टाइम्स ऑफ इंडिया'तील वृत्त) ■

**21, शांतिनिकेतन, काशिनाथ धुरू मार्ग, कीर्ती महाविद्यालयासमोर, दादर (प०),**
**मुंबई 400 028. दूरभाष : (022) 2437 4786**

**बर्गरच्या आत श्रीखंड**

'भाषेचे प्रदूषण होण्याचं प्रमुख कारण म्हणजे इतर माध्यमेही तेवढीच किंबहुना त्याहून जास्त भ्रष्ट झालेली आहेत. वर्तमानपत्रांची भाषा इतकी खराब झालेली आहे की ज्यांनी लोकांसमोर उत्तम भाषा ठेवावी अशी अपेक्षा आहे तेच बुरूज ढासळत आहेत. 'पावसाने सामन्यावर पाणी फेरले' अशी भाषा जर मान्यवर मराठी वर्तमानपत्रात वापरली जात असेल तर मार्गदर्शक म्हणून लोकांनी पाहायचं कोणाकडे? समाजमन घडविण्याची जबाबदारी भाषिक वर्तमानपत्रांची नाही का? बरं झालंय असं की इतर लोकही भ्रष्ट भाषेचे आंधळे अनुकरण करू लागले आहेत. त्याला ते 'आजच्या तरुणांची भाषा' असं गोंडस लेबल लावतात. संदीप खरेसारखा उत्तम कवी जर मुद्दाम इंग्रजी शब्द काव्यात वापरून त्या भाषेला मार्लिश (मराठी इंग्लिशचा वर्णसंकर) म्हणत असेल तर मग आपण दुसरं काय म्हणणार? का भाषा एकमेकात मिसळायची? बर्गरला आतमध्ये श्रीखंड लावून खाल का? नाही. ती सरमिसळ नाही आवडणार ना? मग भाषेची का करायची? अशाने प्रमाणभाषाच बदलून जाते. भाषेच्या पावित्र्यासाठी आता आंदोलन करायची वेळ आलेली आहे.

अभय परांजपे, 'दै. लोकसत्ता' २८-०५-०९

# काही उपाय आहे का?

शरदिनी मोहिते

एप्रिलनं चांगलंच भाजून काढलेलं. भारनियमन भरात आलेलं. चुकून वीज असलीच तर पंख्याकडून गरम वाऱ्याचेच फवारे उडत राहणार. घराजवळच्या नदीच्या पात्रावर पाण्याच्या वाफांचा नाच रंगणार. - अशा तऱ्हेच्या, एक मे च्या 'रम्य' दुपारी टीव्ही लावला, तर एक 'बहारदार' संवाद कानावर पडला-

''तू हर्ट झालायस का?''

''मीच तिला हर्ट केलं होतं...''

''पण...''

''आमच्या रिलेशनशिपला फुलस्टॉप करण्याचा तिनं निर्णय घेतलाय ग...''

सकाळपासून 'जय जय महाराष्ट्र माझा' ऐकायला येत असताना, 'मी मराठी ऽ मी मराठी'चा नाद घुमत असताना महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेनं पन्नासाव्या वर्षात प्रवेश केल्याचा आनंद अनुभवत असताना दुपारी दोन वाजताच्या एका मराठी मालिकेतला हा संवाद कानावर पडला. हे तरुण-तरुणी त्या देवळाच्या प्रांगणात काय बोलतायत? कोणत्या भाषेत हे आधी कळलं नाहीच; नंतरही कळेल असं वाटत नाही!

अलीकडे अशीच मिंग्लिश भेळ आपल्या पुढ्यात येते, आणि ती पचता पचत नाही, रुचता रुचत नाही अशी आपली अवस्था होऊन जाते...

शाळेतून घरी परतणारा छोटा मुलगा आपल्या मित्राला 'थट्टी डेज'ची सुट्टी मिळाल्याचं आपल्या आईला सांगताना, 'त्याचे आईज यलो यलो होते' याचं साभिनय वर्णन करून सांगताना आपण नेहमीच पाहतोय. पोरगं म्हणतंय, 'ममी, मी का नाही आजारी पडत?' आई म्हणते, 'चान्सच नाही!' मग 'वॉटर प्युरिफायरचं' उपकरण आपल्या दाखवून झाल्यावर मुलगा म्हणतो, ''मला कधी मिळणार थट्टी डेजची सुट्टी?'' तर आई म्हणते, 'समर व्हेकेशन!'...

एकीकडे कधी तरी नीना कुलकर्णी मुलाखतीत म्हणते, ''मराठी न येण्यात भूषण वाटण्याचा काळ आला आहे...'' कधी तरीच अशी हळहळ ऐकायला मिळते. एरवी सरमिसळच ऐकावी लागते.

'अल्बम रिलीज झाला', 'प्रेक्षक ॲप्रिसिएट करतायत', 'नर्व्हस आहेस?', 'एक्साइटमेंट आहे का?', 'इव्हेंटची तयारी', 'दॅट् हेल्प्स मी अलाँग', 'यू कॅन गो अलाँग विथ्', 'सेलिब्रिटी डान्सर्स', 'प्रमोशनल इव्हेंट', 'एक्स्प्लॉइट करते आहेस का?', 'अँकरिंग करणार आहे' अशा प्रकारची धो धो शब्दयोजना सूत्रसंचालिका आणि स्टार्स यांनी केलेली एकाच स्टार एक्स्प्रेसच्या १२ एप्रिलच्या कार्यक्रमात ऐकावी लागली. याच कार्यक्रमात उर्मिलाला विचारले, 'या इव्हेंटमधे तू काय परफॉर्म करते आहेस?'... एका प्रश्नाला तिनं उत्तर दिलं 'मी अग्निहोत्र फॉलो करते...'

राग येण्याच्या किंवा कीवही करण्याच्या पलीकडची गोष्ट नाही का ही?... ही थोडी झलक पाहूनही गरगरायला लागलं ना? आहे काही उपाय या भाषा-स्थितीवर?

■

A-1/4, शरयू, तरितानगरी, फेज २, सिंहगड मार्ग, पुणे 411 030.
दूरभाष : (020) - 2433 8353

## 'लिपसिंक'चा प्रताप !

आजकाल होतं असं की एखादी जाहिरात मूळ हिंदी किंवा इंग्रजीमध्ये तयार करण्याचे कंत्राट एखाद्या निर्मात्याला दिले जाते आणि मग त्यालाच आणखी चार-सहा भाषांत ती डब करून द्या असं सांगितलं जातं. मग डबिंग करताना मूळ उच्चारांमध्ये झालेल्या ओठांच्या हालचालींशी ताळमेळ राखण्यासाठी (त्याला लिपसिंक असे म्हणतात.) शक्यतोवर तेच किंवा तसेच शब्द वापरण्याकडे लोकांचा कल वाढतो आणि मग त्यातून 'वाकडा' आहे पण माझा आहे'. अशी कॉपी जन्माला येते. तुम्ही स्वतःशी म्हणून पहा. 'टेढा' आणि 'वाकडा' हे दोन शब्द म्हणताना ओठांच्या हालचाली साधारण सारख्याच होतात.

पण डबिंगसाठी हे करणेही चुकीचे आहे. कारण लोक अडाणी आहेत असे त्यामध्ये गृहित धरलेले आहे. उदाहरणार्थ शाहरूख खान जर मराठीमध्ये 'तू स्प्राईट पी स्प्राईट' असं म्हणत असेल तरी तो मराठी नाही आणि हे मराठी तो बोललेला नाही हे मराठी प्रेक्षकांना माहीत आहे. शिवाय एका भाषेतून दुसऱ्या भाषेत डबिंग करताना ते शंभर टक्के लिपसिंक करता येणार नाही हे तर अगदीच उघड आहे. कारण मुळातच ते अनैसर्गिक आहे. मग असा अट्टहास करून त्यातून विकृत भाषा समोर आणण्यापेक्षा भाषा चांगली ठेवली आणि लिपसिंककडे दुर्लक्ष केलं तरी चालण्यासारखं आहे.

अभय परांजपे, 'दै० लोकसत्ता' २८-०५-०९

# आधुनिक प्रचारतंत्राचे नवीन बळी : मराठी भाषा आणि भारतीय संस्कृती

विजय पाध्ये

मराठी भाषेची लक्तरे रस्त्यांवरच्या पाट्यांवर, नेतेमंडळींच्या गौरवार्थ लावल्या जाणाऱ्या फलकांवर, आकाशवाणीच्या कार्यक्रमांत, चित्रवाणीच्या पडद्यावर व अन्यत्र टांगलेली दिसतात. आपल्या उदासीनतेमुळेच परभाषांचा प्रभाव मराठी भाषेवर दिवसेंदिवस वाढत जाऊन ती अधिकाधिक विकृत होऊ लागली आहे. मराठी लेखनात आपण हिंदीच्या वाढत्या प्रभावामुळे सर्रास 'आम्हाला संपर्क करा', 'मी तुझी मदत करू शकत नाही' अशा प्रकारची वाक्यरचना हताश होऊन पाहात आहोत.

चाऊस मराठी-इंग्रजी डिक्शनरीचे प्रचंड स्वागत अनुभवाला आल्यानंतर श्री० अब्दुस्-सलाम चाऊस ह्यांच्या 'यशशास्त्र' ह्या नवीन पुस्तकाच्या अनेक वर्तमानपत्रांतून मोठ्या प्रमाणावर जाहिराती प्रसिद्ध झाल्या. तरुणवर्गाला यशाचे आश्वासन देणारी व अनेक यशस्वी व्यक्तींचे व त्यांच्या उद्योगधंद्यांचे दाखले देणारी पुस्तकाची भाषा हे ह्या यशामागील इंगित दिसते. चाऊस ह्यांनी हाच धागा पकडून हे मराठी 'यशशास्त्र' विणलेले दिसते.

हे पुस्तक तांत्रिकदृष्ट्या अतिशय उत्तम दर्जाचे ठरावे. त्यासाठी लेखक (प्रकाशक ते स्वत:च आहेत), मुद्रक, मुद्रितशोधक, व्यवस्थापक वगैरे सर्वांनी कमालीचे श्रम घेतल्याचे स्पष्ट दिसून येते. मुद्रणदोष जरूर आहेत; परंतु ते नगण्य ठरावेत इतके किरकोळ आहेत. पुस्तकात कुठेही ते भाषांतर वा रूपांतर असल्याचा उल्लेख केलेला नाही. परंतु आपल्या सहज ध्यानात येते की ते अशाच आशयावरील उपलब्ध असलेल्या दोनचार इंग्रजी पुस्तकांचे सरळ मराठी भाषांतर करून, एकत्र मिसळून आपल्यापुढे ठेवण्यात आले आहे. हे भाषांतर करताना मात्र मराठीची वाट लावली आहे!

१. इंग्रजीतील 'बॅडली' ह्या आत्यंतिक गरजेसाठी वापरल्या जाणाऱ्या शब्दाचे भाषांतर 'वाईटरित्या' असे केले आहे. 'तुम्ही कुठलंही वाजवी ध्येय प्राप्त करू शकता. प्रश्न एकच आहे, यशस्वी होण्याची इच्छा किती तीव्र आहे? किती वाईटरित्या तुम्हाला ते पाहिजे?'', ''जेव्हा माणसाला एखादी गोष्ट वाईटरित्या हवी असते, ते मिळवून देण्यासाठी संपूर्ण सृष्टी त्याच्या पाठीशी उभी असते'' (पृ० ४८);

''आज जगात संधी इतक्या वाईटरित्या उपलब्ध आहेत ते याचमुळे...'' (पृ० १६१); ''या दोन गोष्टी वाईटरित्या समान आहेत'' (पृ० १७०).

२. 'काम पूर्ण होईपर्यंत काम करत राहायला स्वत:ला विवश करा'.

३. काही ठिकाणी वाक्यरचना थेट इंग्रजी वाक्यरचनेवर बेतलेली दिसून येते. 'अशा माणसासाठी काहीच अशक्य नाही ज्याला माहीत आहे त्याला काय पाहिजे आणि ते मिळविण्याचा ज्याने निश्चय केला आहे' (पृ० ४१); 'मी तुम्हाला मोठं यश चिंततो, जरी मला माहीत आहे केवळ चिंतण्याने कोणाला यश मिळत नाही' (पृ० २२१) अशी वाक्ये वाचायला मिळाली तेव्हा आपण 'बैबल'ची मराठी आवृत्ती वाचतो आहो की काय असे वाटते. शेवटी (पृ० २२२) वाचकांना केलेल्या आवाहनात तर लेखकाने तुमच्या प्रतिक्रिया, तुमचे विचार, तुमचे प्रश्न 'निमंत्रित' केले आहेत!

४. 'अनिश्चय सैतानाचे सर्वात प्रभावी हत्यार आहे' (पृ० १२९). 'सैतान' ह्या विशिष्ट धर्मातील संकल्पनेचे हे निव्वळ शब्दांतर नव्हे काय?

५. आता सर्वांत महत्त्वाचा मुद्दा. हे काही इंग्रजी पुस्तकांचे भाषांतरच आहे असे वाटते, कारण ज्या अग्रणी उद्योजकांची, यशस्वी म्हणून गणल्या गेलेल्या उद्योगांची, तत्त्वज्ञांची नावे देऊन दाखले दिले आहेत त्यापैकी एकही व्यक्ती वा उद्योग भारतीय नाही! महात्मा गांधी, विवेकानंद, बाबा आमटे, महात्मा फुले, अब्दुल कलाम, महर्षी कर्वे, जयंत नारळीकर, रघुनाथ माशेलकर, होमी भाभा वगैरेंसारखी भारताचे नाव जगाच्या नकाशावर ठळकपणे उमटविणारी सर्व मंडळी गैरहजर आहेत! ह्यातून आपणच भारतीयांना नाकारले आहे असे ध्वनित होत नाही काय?

हे 'यशशास्त्र', त्याच्या तुफान जाहिरातीमुळे, त्यातील आशयामुळे आणि अगदी माफक म्हणजे ५० रुपयांत मिळत असल्यामुळे त्याचा खप तडाखेबंद होईल ह्यात शंका नाही. परिणामी, पुस्तकाच्या प्रसाराबरोबर मराठी भाषेच्या सध्याच्या विकृत स्वरूपात अधिक भर पडण्याचा व भारताच्या मातीतल्या कुणाचाच उल्लेख पुस्तकात न केल्याने नव्या पिढीपुढे आपल्या भारतीयत्वाबद्दल आदराची, अभिमानाची भावना न राहण्याचाच धोका आहे. ■

4, चित्रा 'बी', विद्यासागर सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037.
दूरभाष : (020) 2421 1951; चलभाष : 098220 31963
E-mail:v.padhye@gmail.com

# रुचेची ना, पटेची ना !

BAJAJ
*Distinctly Ahead*

**पोलादी बाइक.**
**आता पिघळवणाऱ्या ऑफर सह.**
बजाज डिस्कवर 135 DTS-i* वर रु.2000* ची सूट मिळवा.

(१) ही जाहिरात वाचून मराठीचे सारे अभिमानी अगदी 'पिघळून' जातील !

पटरीच्या दोन्ही बाजूकडे पहा

जर सुरक्षित असाल तरच पुढे चला

सर्व सड़क वाहन चालक मोटर वाहन अधिनियम 1988 धारा 131 व भारतीय रेल्वे अधिनियम धारा - 161 चे अवश्य पालन करावे. चौकीदार रहित रेल्वे समपार फाटक पार करते वेळी असावधानी केल्यास एका वर्षापर्यंत कैदेच्या सजेचे प्रावधान आहे.

**मध्य रेल्वे**
आपली सुरक्षा - आमची प्राथमिकता

(२) फक्त मराठीचेच भाषक असाल तर सुरक्षित 'असाल' अशी खात्री नाही.

होमशॉप18 पाहा | HOME SHOP 18 *Shopping - Jab Mann Kare*

Mitashi 5 इन 1 कॉर्डलेस हेडफोन + FM रेडियो

Citizen रक्तदाब सूचक

GlucoLeader Value मधुमेह देखरेख किट

आत्ता हुकुम करा 0120-4444918 करा HS18 51818 वर

(३) यांपैकी एखादी वस्तू मागवायची तर हुकूम द्यायला हवा !










**दखलयोग्य**

# भाषेकडे कुतूहलाने पाहू या...

**वर्षा सहस्रबुद्धे**

कोणालाही अतिशय सहज उपलब्ध असल्यामुळे भाषेच्या उपलब्धतेबाबत आपण काहीसे बोथट होऊन जातो की काय याचा विचार करायला हवा. मुलांना भाषिक समृद्धी द्यायची असेल, तर हा बोथटपणा घालवायला लागेल. भाषेकडे जाणीवपूर्वक बारकाईनं आणि संवेदनशीलतेनं बघायला शिकावं लागेल... यासाठी करण्यासारखं खूप काही आहे; त्यापैकी शब्दांच्या काही खेळांबद्दल आपण समजून घेणार आहोत. मुलांना तर हे खेळताना विचार करायला मजा येतेच. पण आपल्यालाही तितकीच मजा येते !

कोणत्याही भाषेत शब्द एक असला तरी वेगवेगळ्या संदर्भात त्याचा अर्थ वेगवेगळा होतो, असे कितीतरी शब्द सापडतात. हे शब्द शोधणं मोठं रंजक असतं. मुलांच्या बहुदिश विचाराला त्यातून उत्तम प्रकारे चालना मिळते. नेमकेपणानं शब्दाच्या अर्थाचं वर्णन करण्याची क्षमताही त्यातून वाढीला लागते. मुलांनी शोधलेले शब्द आणि आपल्या स्वत:च्या शब्दात सांगितलेले अर्थ पाहा -

खार म्हणजे झाडावर चढणारी खार आणि लोणच्याचा खार.
पाट म्हणजे बसायचा पाट आणि पाण्याचा पाट.
पाठ म्हणजे आपली पाठ आणि कविता पाठ करतात ते पाठ.
वाट म्हणजे चालायची वाट आणि खाऊ वाट.
मोजा म्हणजे पायात घालतात तो मोजा आणि वस्तू मोजा.
घास म्हणजे भांडी घास आणि आपण खातो तो घास.
वा म्हणजे शाब्बास आणि रागवतात ते वा.
वाढ म्हणजे मोठं होतात त्याला म्हणतात आणि मला भात वाढ.
काढा म्हणजे चित्र काढा किंवा वही पिशवीतून काढा किंवा औषध पितात तो काढा.
मान म्हणजे मान द्यायचा असतो तो मान आणि आपली मान.

- अशा सोप्या शोधांनी सुरुवात केली की पुढे एका शब्दाचे विविध संदर्भातले अर्थ शोधण्याचं आव्हान मुलं आनंदानं आणि सक्षमपणे पेलायला लागतात. भाषेकडे

डोळसपणे आणि सखोलपणे बघणं हळूहळू त्यांच्या अंगवळणी पडत जातं. आपल्यालाही चटकन लक्षात येणार नाहीत असे असंख्य संदर्भ मुलं शोधून काढतात. आतापर्यंतचा मुलांचा भाषिक अनुभव, मुलाचं वाचन, त्यांच्या भोवताली त्यांना ऐकायला मिळणारी भाषा हे सगळं मानसिक पातळीवर या निमित्तानं उजळलं जातं आणि नवा संदर्भ त्यांच्या मनात चमकला की त्यांचे डोळेही चमकून जातात!

पुण्यात गेली आठ वर्षं मूलगामी भाषा विकास केंद्रात, दर शनिवारी मी मुलांबरोबर असते. तिथं चालणाऱ्या भाषेच्या वर्गात 'पडणे' या क्रियापदाचे मुलांनी शोधलेले असंख्य संदर्भ लिहिताना माझी दमछाक झालेली मला अजून आठवते. त्यातले काही संदर्भ, मुलांच्याच शब्दात, खरोखर पाहण्यासारखे आहेत :-

> कोणीतरी खाली पडतं. घड्याळाचे ठोके पडतात. दात पडतो. कधी कधी भांग नीट पडत नाही. खड्डा पडतो. भाग पडतात. पाऊस पडतो. ऊन पडतं. थंडी पडते (म्हणजे सुरू होते.) वारा पडतो (म्हणजे थांबतो.) बर्फ पडतो, गारा पडतात. अंधार पडतो आणि उजेड पण पडतो. झाडाची पानं पडतात. कापडाला, कागदाला किंवा कशालाही भोक पडतं. सांडलं की डाग पडतो. खळी पडते. दुपारी आजी पडते म्हणजे जरा वेळ झोपते. निवडणुकीत काहीजण पडतात. किती मार्क पडले? गाडी बंद पडते, घड्याळ बंद पडतं. माणूस मेला की त्याचं हृदय बंद पडतं. हे तुम्हाला केवढ्याला पडलं? स्वस्त पडलं, महाग पडलं. लागलं की कधीकधी पाय काळानिळा पडतो. असं म्हणतात की तुमच्या तोंडात साखर पडू दे. पिकावर रोग पडतो. सिनेमा चालला नाही की पडतो, नाटक संपलं की पडदा पडतो. चेहेरा पडतो. भूकंपात त्यांचं घर पडलं. स्वप्न पडतं. टक्कल पडतं!!

याहून कितीतरी जास्त संदर्भ, मोठ्यांनी विचारात पडावं इतके नाना संदर्भ मुलांनी शोधले...

भाषेकडे कुतूहलाने बघण्याची सुरुवात करायचा अवकाश, त्यातली मजा पुन:पुन्हा अनुभवण्याचा मोह आपल्यालाही न झाला तरच नवल! ■

**दै० लोकसत्ता, पुणे. २ मे, २००९**



अनुक्रमणिका

**पुस्तक-परीक्षण**

# उत्तम अध्यापनाची रहस्ये

**दिलीप धोंडगे**

[परीक्षित पुस्तक : उत्तम अध्यापनाची रहस्ये. संपादन व प्रस्तावना - डॉ० विनय किरपाल. मराठी अनुवाद - डॉ० संध्या काणे. अनुवादाचे संपादन व प्रस्तावना - डॉ० अशोक रा० केळकर. डायमंड पब्लिकेशन्स, पुणे. पृ०१४+२३०. किं०रु० २००]

अध्ययन, अध्यापन व मूल्यमापन ही त्रयी हा शिक्षणप्रक्रियेचा गाभा आहे. या त्रयीतील अध्यापन या घटकाला केंद्रस्थानी ठेवून देशातील वीस नामवंत शिक्षकांनी आपली उत्तम अध्यापनाची रहस्ये शोधण्याचा प्रयत्न करून ती या ग्रंथात प्रस्तुत केली आहेत. 'सीक्रेट्स ऑफ गुड टीचिंग' या मूळ इंग्रजी पुस्तकाचे संपादन डॉ० विनय किरपाल यांनी केले असून त्याचा मराठी अनुवाद डॉ० संध्या काणे यांनी केला आहे. मराठी अनुवादाला डॉ० अशोक केळकरांच्या संपादनाचा व प्रस्तावनेचा लाभ झाला आहे.

ज्या वीस प्राध्यापकांनी आपले अध्यापनविषयक अनुभव नमूद केले आहेत, ते मानव्यविद्या, सामाजिक शास्त्रे, विज्ञाने आणि अभियांत्रिकी विद्याशाखांत विविध विषयांचे अध्यापन करणारे नाणावलेले शिक्षक आहेत. प्रयोगशीलतेने आणि तळमळीने आपला पेशा करण्यामुळे ते नाणावलेले आहेत. त्यांच्या कार्याची नोंद घेऊन त्यांना विशेष प्रवीण शिक्षक म्हणून गौरविले गेले आहे, काहींना तर दोनदा गौरविले गेले आहे. यांपैकी नऊ शिक्षक हे आय०आय०टी० मुंबई, कानपूर, खरगपूर ह्या संस्थांतील आहेत. काही पुणे, मुंबई, सिंगापूर, दिल्ली, अमेरिका इत्यादी विद्यापीठांतील आहेत. काही पुणे, मुंबई येथील महाविद्यालये तसेच फिल्म अँड टेलिव्हिजन इन्स्टिट्यूटशी निगडित होते वा आहेत. चित्रपट रसग्रहण, करार, विमा, बौद्धिक संपदा कायदा, विद्युत व यंत्र अभियांत्रिकी, गणित, मानसशास्त्र, भौतिक विज्ञान, जैवतंत्र विज्ञान, तर्कशास्त्र व तंत्रज्ञान, इतिहास, इंग्लिश साहित्य, संगणकशास्त्र या विविध विषयांच्या या अध्यापकांनी आपले प्रचीतीचे बोल ऐकवले आहेत. यामुळे इथे उपदेशकाची भूमिका कोणीही घेतलेली नाही. उपदेशकाजवळ तात्त्विक ज्ञान असते तर शिक्षकाजवळ अनुभवजन्य ज्ञान असते या फरकाची इथे जाणीव होते. आपण नेहमीच शिक्षक

राहिलेलो आहे, उपदेशक नाही; हे संपत पी सिंग यांचे म्हणणे यामुळे पटते.

भारतात उच्च शिक्षणक्षेत्रात कार्य करणाऱ्या शिक्षकांना अध्यापनाचे प्रशिक्षण घ्यावे लागत नाही. त्याने संशोधन करून स्वत:ला प्रशिक्षित करावे अशी अपेक्षा असावी असे दिसते. पण अध्यापकांना प्रशिक्षणाची तरतूद करून ते अनिवार्य करावे असे डॉ० केळकरांनी प्रस्तावनेत नमूद केले आहे. प्रशिक्षणाऐवजी संशोधनाचा पर्याय निकृष्टावस्थेत पर्यवसित झाला आहे. सुमार व वाईट प्रबंधांची संख्या भरमसाठ वाढत आहे. डॉ० केळकरांनी या वस्तुस्थितीची स्पष्टपणे नोंद केली आहे. ज्यांना एम०फिल०,पीएच०डी०चे संशोधनपर प्रबंध जमले नाहीत, त्यांच्यासाठी सेट आणि नेटच्या 'चाचण्या' उपलब्ध करून देण्यात आल्या आहेत असेही डॉ० केळकर यांनी आपले निरीक्षण मांडले आहे. पण वस्तुस्थिती मात्र उलट्या स्थितीत दिसत आहे. ज्यांना सेट व नेटच्या जाळ्यांतून बाहेर पडणे मुश्किल होते ते एम०फिल० किंवा पीएच०डी०साठी नाव नोंदवतात व झटकन पदवी हस्तगत करून मोकळे होतात. मध्यंतरी सेट व नेटला पर्याय म्हणून एम०फिल०,पीएच०डी०ची तरतूद झाल्याची अर्धवट माहिती प्रसृत होताच शेकडो हजारोंनी एम०फिल०,पीएच०डी०ला आपली नावे नोंदविली. थोडक्यात सेट व नेटपेक्षा संशोधनपर पदव्यांचा दर्जा खालचा झाला आहे. सध्या सेट, नेट नसलेल्या पण सेवेत असलेल्या प्राध्यापकांनी सेट नेटची अट शिथिल व्हावी यासाठी यूजीसीकडे अर्ज केले आहेत. प्राध्यापक संघटनेनेही ही शिथिलीकरणाची मागणी लावून धरली आहे. या एकंदर गदारोळात अध्यापनविषयक प्रशिक्षणाच्या व्यवस्थेचे कोणालाच भान नसल्याचे दिसते आहे.

मूळ इंग्रजी पुस्तकाच्या संपादक डॉ० किरपाल यांनी आपल्या प्रास्ताविकात दोन महत्त्वपूर्ण गोष्टींची नोंद केली आहे. भारतातील व्यावसायिकदृष्ट्या अप्रशिक्षित असा महाविद्यालयीन शिक्षक आपल्या व्यावसायिक आयुष्यात सुमारे २०,००० विद्यार्थ्यांना शिकवतो. एवढ्या मोठ्या संख्येच्या विद्यार्थ्यांवर संस्कार करणारा शिक्षक अध्यापनविषयक पद्धतींशी परिचित नसावा, ह्या विरोधाभासाची एक नोंद व पाश्चिमात्य शिक्षणपद्धती व एतद्देशीय शिक्षणपद्धती यांतील भेदांची नोंद करताना तिकडे व्याख्यानांची संख्या मर्यादित असते, पुन्हा त्या वर्गांना साप्ताहिक अभ्यासवर्गाची जोड असते, हे वर्ग-शिक्षक साहाय्यक (ट्यूटर) घेतात, आणि त्यातील विद्यार्थिसंख्या मर्यादित असते. भारतीय शिक्षणव्यवस्थेत ट्यूटरची योजना नसल्यामुळे व्याख्यान-पद्धतीचाच अवलंब केला जातो.

अध्ययन, अध्यापन व मूल्यमापन या त्रयीतील प्रत्येक घटकातील गुंतागुंत कशामुळे निर्माण होते? प्रत्येक देशाची बहुवांशिकता, बहुसांस्कृतिकता, बहुभाषिकता,

बहुप्रांतीयता, बहुधर्मीयता इत्यादींमुळे! पण हे एक कारण झाले. याशिवाय, अध्ययनाशी संबंधित विद्यार्थी, त्यांचे पालक, त्यांची आर्थिक-सामाजिक परिस्थिती; अध्यापनाशी निगडित शिक्षक, त्याची इच्छाशक्ती, त्याची क्षमता तसेच मूल्यमापनाशी निगडित विद्यार्थी व शिक्षक यांचे ज्ञाननिष्ठ धोरण किंवा परीक्षानिष्ठ धोरण, हेही एक कारण ध्यानात घ्यावे लागते. या पुस्तकातील वीसही शिक्षकांच्या चिंतनामुळे ही गुंतागुंत बऱ्याच प्रमाणात लक्षात येते. या शिक्षकांचा चिंतनाचा पैस पुढीलप्रमाणे मांडता येईल. विद्यार्थी व शिक्षक यांत देवाणघेवाण व्हावी यासाठी वर्गाचे अवकाशात रूपांतर व्हायला हवे, सांकल्पनिक ज्ञानाचे सुबोधीकरण करून विद्यार्थ्यांप्रत पोचविण्यासाठी शिक्षकाला पूर्वतयारी करून विषयाचे गांभीर्यही टिकवायला हवे. विद्यार्थ्यांना गृहीत न धरता, त्यांना समजून घेणे हे शिक्षकांनी आपले कर्तव्य मानायला हवे. फळा वगैरे पारंपरिक दृक्‌श्राव्य उपकरणे, पारदर्शिका, इलेक्ट्रॉनिक शैक्षणिक उपकरणे, पॉवर पॉइंट प्रेझेंटेशन, साइन पोस्ट्स, वेब व ऑनलाइन पान इत्यादींचा उपयोग करणे, खडूफळा व व्याख्यान यांचा समुचित संगम साधणे, चर्चापद्धतीचा वापर करणे, विद्यार्थ्यांना प्रश्न विचारायला प्रवृत्त करणे, पाठ्यपुस्तक या शैक्षणिक साधनाचा कौशल्याने वापर करणे, प्रसंगी शिक्षकानेच पाठ्यपुस्तक होणे, शिक्षकाचे आपल्या विषयावर प्रेम असणे, शिक्षणप्रक्रियेतील अवकाश हा विद्यार्थ्यांच्या कृतींना अवसर देऊन भरून काढणे, अभ्यासक्रमाचे उद्दिष्टानुवर्ती आकलन करणे, भोवतालच्या परिस्थितीशी अध्यापनपद्धतीची सांगड घालणे, शिक्षकाने आपली देहबोली परिणामकारक करणे, कच्च्या विद्यार्थ्यांना नाउमेद न करता त्यांना अंगीकारणे, विद्यार्थी व शिक्षकांत ममतेचे नाते निर्माण करणे, विद्यार्थ्यांसाठी शिक्षकाने कायम उपलब्ध असणे, संकल्पना सुबोध करण्यासाठी शिक्षकाने कल्पकतेने उदाहरणांचा वापर करणे, गाणी, गोष्टी, खेळ, जाहिराती, विनोद, किस्से इत्यादींचा सुबोधीकरणासाठी वापर करणे, आकृत्या, तक्ते, ग्राफ्स, इंटरॲक्टिव्ह संगणक प्रोग्रॅम यांचा वापर करणे, विद्यार्थ्यांना वक्तशीरपणा व शिस्त यांचे महत्त्व पटवून देणे, शिक्षकाने आपले व्यक्तिमत्त्व खुले व उमदे ठेवणे, शिक्षक हा अध्यापनप्रक्रियेत आपातत: विद्यार्थी असतो याचे भान ठेवणे, शिक्षकाने अखंड जिज्ञासावृत्ती ठेवून सतत व्यासंग करणे, अध्यापनाच्या माध्यमावर शिक्षकाचे प्रभुत्व असणे, वेळेचे नियोजन करून वेळेत अभ्यासक्रम पूर्ण करणे, पूरक वाचनासाठी नेमके संदर्भ सुचविणे, विद्यार्थ्यांकडून प्रकल्प करून घेणे, इत्यादी इत्यादी गोष्टींनी हा पैस व्यापलेला आहे.

या पुस्तकातील शिक्षकांच्या दृष्टिकोनांची कल्पना यावी यासाठी त्यांच्या लेखांची शीर्षके पाहावीत : 'शिक्षक म्हणून विकास होताना', 'अध्यापन : एक बागकाम', 'प्रत्येक सामान्य विद्यार्थ्यातील उत्कृष्टता बाहेर निघेल असे पहा', 'गणिताच्या भयाच्या

पलीकडे नेणे', 'उत्कृष्टतेशी बांधिलकी', 'उत्कट ओढ हीच गुरुकिल्ली', 'अध्यापन म्हणजे स्पष्टतेचा शोध', 'अध्यापनात शॉर्टकट्स नकोत', 'चांगले अध्यापन : एक वृत्ती', 'अध्यापन : एक कला', 'आनंददायी तासांची सोबत', इत्यादी.

या शिक्षकांनी आपल्या विवेचनाच्या ओघात थोरामोठ्यांची शिक्षणविषयक मते उद्धृत केली आहेत. त्यांचे वाचन शिक्षणप्रक्रियेचे एक सम्यक स्वरूप कळण्याच्या दृष्टीने मदतकारक ठरते. उदाहरणार्थ : सुप्रसिद्ध मानसोपचारतज्ज्ञ कार्ल मेनिंगर म्हणतात : 'शिक्षक काय आहे हे तो कसा शिकवितो यापेक्षा अधिक महत्त्वाचे आहे.' (प्रकरण ८); विल्यम ऑर्थर वॉड म्हणतात : 'सुमार दर्जाचा शिक्षक केवळ सांगतो, चांगला शिक्षक स्पष्टीकरण करतो, त्याहून उत्तम शिक्षक दाखवून देतो, आणि महान शिक्षक स्फूर्ती देतो' (प्रकरण ८); एका उपदेशकाने सांगितल्याप्रमाणे, ''जर माझ्या उपदेशाच्या वेळी कोणी झोपले तर मला जागे करा.'' (प्रकरण ९); जॉर्ज बर्नार्ड शॉ म्हणाले होते, ''जे काही करू शकतात, ते करून सोडतात. जे करू शकत नाहीत, त्यांनी शिकवावे.'' (प्रकरण १०); मार्क ट्वेन यांची धोक्याची सूचना अशी : 'तुमच्या शिक्षणात शाळेची लुडबूड नको.'' (प्रकरण १०); ''सॉक्रेटीस तत्त्वज्ञान शिकविताना विद्यार्थ्यांच्या प्रश्नांचे काळजीपूर्वक परीक्षण करून त्यांनाच त्यांची योग्य उत्तरे शोधायला लावत असत व त्यायोगे मूळ प्रश्नाप्रत नेत असत.'' (प्रकरण १८); ''हिटलरने वेगळ्या संदर्भात म्हटले आहे की भाषण असे असायला हवे की, जे सर्वांत कमी प्रतीच्या व्यक्तींपर्यंत पोचेल.'' (प्रकरण १९); हार्वर्ड युनिव्हर्सिटीच्या कॉलेज ऑव्ह एज्युकेशनचे माजी डीन प्रा० थिओडोर आर० साईझर म्हणतात की, ''आजच्या शिक्षणपद्धतीत चांगला शिक्षक हा विद्यार्थ्यांच्या शिकण्यासाठी केवळ अलगद ज्ञान पोचवणारा मध्यस्थ, कॅटलिस्ट असतो.'' (प्रकरण १)

या एकूण माहितीमुळे गुंतागुंतीची बरीच कल्पना येते. या गुंतागुंतीत प्रत्येक शिक्षकाने प्रयोगशीलतेने सहभागी होणे हे शिक्षणप्रक्रियेतील गुंतवळ उकलण्यासाठी साहाय्यकारी ठरू शकते. तरीही प्रशिक्षणाचा मुद्दा अनिर्णित राहायला नको. मूळ इंग्रजी पुस्तकाचे परीक्षण करताना प्रा० अमरिक सिंग यांनी आपल्या लेखाच्या अखेरीस जे म्हटले आहे, तेच मी या लेखाच्या अखेरीस उद्धृत करतो. "The fact of the matter is that the training of a teacher is crucial for the quality of performance. Unless we deal with this issue systematically and determinedly, all that we would be doing would be to grumble.'' (University News, 45 (33), Aug. 13-19,2007, p.30) ■

'कल्पलता', पं०ध० पाटीलनगर, सटाणा 423 301. दूरभाष : (02555) - 224 667

**पुस्तक-परीक्षण**

# भाषिक संघर्षाचे समाजशास्त्र

विवेक भट

[परीक्षित पुस्तक : ‘भाषिक संघर्षाचे समाजशास्त्र’ - रवींद्र केळेकर, कोंकणीतून मराठीत अनुवाद आणि संपादन - डॉ० अरुणा दुभाषी, राजहंस वितरण, पणजी. २००८. पृष्ठे १७०. किंमत रु० १३५]

रवींद्र केळेकर हे कोंकणीत आणि मराठीत लिहिणारे एक सिद्धहस्त लेखक आहेत. अलीकडेच ज्ञानपीठ पुरस्काराने त्यांना सन्मानित करण्यात आले आहे. स्वत: एक बहुभाषाप्रेमी, चिंतनशील आणि समंजस भूमिका घेणारे लेखक असूनही गोवामुक्तीनंतरच्या भाषिक वादात केळेकर सामील झाले व कोकणीचा पक्ष घेऊन गोव्यातील मराठीच्या स्थानाला कडवा विरोध करीत आले.

भाषा, भाषिक संघर्ष आणि विशेषत: मराठी - कोंकणी वाद या विषयांवरील केळेकरांच्या काही व्याख्यानांचे आणि नियतकालिकांत वेळोवेळी प्रकाशित झालेल्या काही निवडक लेखांचे संकलन करून डॉ० अरुणा दुभाषी यांनी त्यांचे मराठीत केलेले भाषांतर ‘भाषिक संघर्षाचे समाजशास्त्र’ या नावाने प्रसिद्ध झाले आहे. केळेकरांचे मूळ लेख वेगवेगळ्या वेळी लिहिलेले आहेत; मात्र प्रत्येक लेखाच्या प्रकाशनाचा काळ या पुस्तकात नोंदविलेला नाही.

पुस्तकाचे चार भाग पाडलेले आहेत. त्यापैकी पहिल्या तीन भागांतील एकंदर सोळा लेखांत भाषा, भाषाशास्त्र, भाषेचे समाजजीवनातील स्थान, भाषिक नियोजन, हिंदी-हिंदुस्तानी संघर्ष आणि स्वातंत्र्योत्तर भारतात इंग्रजीचे वाढते महत्त्व याविषयीचे विवेचन आहे; तर त्यानंतरच्या चौथ्या भागातले दहा लेख हे कोंकणी-मराठी वाद आणि त्याचे विविध पैलू या विषयाला वाहिलेले आहेत. असे असले तरी सर्वसामान्य भाषाविषयक पहिल्या तीन भागांमध्येही केळेकरांचे काहीसे महाराष्ट्रविरोधी/मराठीविरोधी मत प्रच्छन्नपणे अधूनमधून डोकावते. उदाहरणार्थ, ‘सुदैव आपले की राज्यांना सैन्य ठेवण्याची सवलत घटनेने दिली नाही; अन्यथा महाराष्ट्रातले नेते बेळगाववर चढाई करण्यास कचरले नसते.’ (पृष्ठ ५९)

‘(मातृभाषा कोणती?) या प्रश्नाचे उत्तर देताना तज्ज्ञांनी संस्कृती परंपरा,

शिलालेख, जुनी कागदपत्रे, भजन, कीर्तन, नाटके असल्याच गोष्टी पुढे करून मुलांना न शिकल्यावाचून जी कधीच येत नाही तीच त्यांची खरी मातृभाषा आहे हे पटविण्यात सारी बुद्धी, शक्ती, खर्च केलेली आहे.' (पृष्ठ ८१). (पुस्तकातील या वाक्यात 'शिकल्यावाचून' या शब्दाऐवजी 'न शिकल्यावाचून' असे छापले गेले आहे!)

पुस्तकाच्या पहिल्या तीन भागांमध्ये भाषा आणि समाज यांचा अन्योन्य संबंध मुख्यत: सोश्योलिंग्विस्टिक्स (सामाजिक भाषाविज्ञान)च्या अंगाने दाखविला आहे, आणि तोही भाषाविज्ञान या विषयाचा भक्कम आधार घेऊन. भाषांचा इतिहास, युरो-भारतीय (इन्डो-युरोपियन) भाषाकुळातील भाषांमध्ये असलेले आश्चर्यकारक साम्य, 'भाषा आणि बोली' हा एक कटुप्रश्न, प्रमाणभाषांची उत्पत्ती, भारतातील भाषा अनेक असूनही सांस्कृतिक सिद्धी एक कशी, अशा अनेक गोष्टींचे विवेचन केळेकरांनी सोप्या भाषेत परंतु शास्त्रीय दृष्टिकोण सांभाळून केले आहे. त्यानंतर भाषिक नियोजनाची आवश्यकता, त्यासाठी महात्मा गांधींसारख्या लोकोत्तर नेत्याने केलेले प्रयत्न, राष्ट्रभाषेच्या प्रश्नाचा 'घोळ' हा सर्व इतिहास आला आहे. 'हिंदी अन् उर्दू या (दोन वेगवेगळ्या भाषा नसून) एकाच भाषेच्या दोन 'शैल्या' (यथामूल) आहेत, लिपीभेदामुळे त्या दोन भाषा मानल्या गेल्या आहेत' हे महात्माजींचे मत (पृष्ठ ४१) भाषाविज्ञानाच्या शास्त्रीय कसोटीवर उतरणारे आहे.

हिंदीवाल्यांनी दाक्षिणात्य भाषांविषयी अत्यंत अनुदार विधाने करून (पृष्ठ ३२) दक्षिणेत - विशेषत: तमिळनाडूत - हिंदीविरोधाची मोठी फळी निर्माण होण्याला हातभार लावला. अशा तऱ्हेने 'हिंदीवालेच हिंदीचे शत्रू बनले' (लेख ८). यातून पुढे निर्माण झाली ती इंग्रजीची गुलामी. लेख १० ते १५ यांमध्ये केळेकरांनी इंग्रजीच्या वाढत्या प्रभुत्वाचा सर्व अंगांनी परामर्श घेतला आहे.

इंग्रजीतून शिकलेले दहा टक्के शिक्षित आणि इंग्रजी शिक्षणापासून वंचित राहिलेले नव्वद टक्के अशिक्षित अशी 'देशाची प्रथम फाळणी येथे झाली' (पृष्ठ ६४), 'इंग्रजीची आजची गुलामी ही पंचतारांकित गुलामी आहे. गुलामीचा इतका जाज्वल्य अभिमान असलेला आपल्या देशासारखा देश पृथ्वीतलावर दुसरा मिळायचा नाही' (पृष्ठ ६७) यासारखी विदारक विधाने केळेकर करतात. केळेकर सुचवितात की प्रशासनातून इंग्रजीचे उच्चाटन झाले पाहिजे, तसे झाले की शिक्षणाचेही माध्यम इंग्रजी राहणार नाही. ही गोष्ट प्रत्यक्षात किती व्यवहार्य आहे हा प्रश्न अलाहिदा. स्वत: केळेकरांचा नातू इंग्रजीतून शिकतो, त्यावर केळेकर शिक्षक, शिक्षण खाते, शिक्षणमंत्री या सर्वांवर चिडतात आणि अखेरीस 'माझी निराशा असहायतेच्या थरावर जाऊन पोचली होती' (पृष्ठ ६४) असे म्हणत एका अर्थी आपल्या पराभवाची कबुलीही देतात.

लेख १७ ते २५ हा भाग पूर्णपणे 'कोंकणी-मराठी संघर्ष' या विषयाला वाहिलेला आहे. महाराष्ट्रात विलीन होण्याविरुद्ध कौल गोमंतकीय जनतेने दिल्यानंतरही गोव्यातील कोंकणी-मराठी वाद हा केवळ सामाजिक किंवा राजकीय वाद राहिलेला नाही. विद्याशाखेच्या पातळीवर तो भाषावैज्ञानिकांच्या कुतूहलाचा आणि अभ्यासाचाही एक महत्त्वाचा भाग झाला आहे. भाषा आणि बोली यांना निश्चितपणे वेगळे करणे हा भाषावैज्ञानिकांच्या दृष्टीने एक फार जटिल प्रश्न आहे. 'कोंकणी ही मराठीची बोली आहे' असे म्हणणाऱ्यांनी 'कोंकणीला व्याकरण नाही,' असा एक अत्यंत हास्यास्पद मुद्दा काढला होता. तो बाजूला ठेवला, तरी 'कोंकणीमध्ये लिखित साहित्य नाही, कोंकणीला स्वतंत्र लिपी नाही, मराठी-कोंकणी या परस्पर-आकलनीय आहेत' यांसारखे इतरही मुद्दे मांडले होते. कोंकणीच्या समर्थकांनी ते तितक्याच हिरिरीने आणि समर्थपणे खोडून काढले होते. अखेरीस भाषा व बोली यांचे स्थान ठरविणं हा केवळ भाषा-विज्ञानाच्या कसोटीवर ठरविण्याचा विषय नसून तो लोकेच्छेने ठरवायचा आहे, असे मत आता भाषावैज्ञानिकांमध्ये रूढ होत आहे.

कोंकणीची चळवळ ही मुळात साहित्यिक चळवळ नव्हती (पृष्ठ ९२). ती राजकीय चळवळ होती आणि तिला झालेला विरोधही राजकीयच होता, हे अगदी खरे आहे.

१९३९ साली कारवारला झालेल्या पहिल्या कोंकणी परिषदेत कोकणी ही स्वतंत्र भाषा आहे असे म्हटले गेले होते. तसेच 'गोव्याच्या उत्तरेकडचा सिंधुदुर्ग अन दक्षिणेकडचा कारवार हा कोंकणी परिसर गोव्याला जोडून एक कोंकणी प्रांत - संयुक्त गोवा वा गोमांचल प्रदेश (?) - बनविला पाहिजे' ही त्या परिषदेची मुख्य प्रेरणा होती (पृष्ठ ९३). १९४५ च्या गोमंतक मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून काकासाहेब कालेलकरांनी 'मराठी आणि कोंकणी या दोन्ही भाषांची एकत्र सेवा' करण्याचा सल्ला गोमंतकीयांना दिला तेव्हापासून कोंकणीची चळवळ सुरू झाली (पृष्ठ ९६-९७). कविवर्य बा० भ० बोरकर व कथाकार लक्ष्मणराव सरदेसाई यांच्यासारख्यांनी कोंकणीची बाजू उचलून धरली. तेव्हापासून ते अगदी गोवा स्वतंत्र होईपर्यंत (१९६१) चळवळीने चांगलाच जोम धरला. अखेरीस गोव्याचे महाराष्ट्रात विलीनीकरण न करण्याचा निर्णय सार्वमत घेऊन करण्यात आला. भारतातील प्रांतरचनेच्या संपूर्ण इतिहासात सार्वमत घेऊन निर्णय करण्याची ही एकमेव घटना होती. (१९६७). लक्षात घेण्याची गोष्ट ही आहे, की प्रांतरचना किंवा विलीनीकरण हा प्रश्न राजकीय असला तरी तो केवळ भाषेच्या मुद्यावरून लढला गेला.

गोव्याचे स्वतंत्र अस्तित्व मान्य होणे (१९८७) ही राजकीय अनुकूलता

लाभल्याबरोबर कोंकणी भाषेच्या विकासाला जोर मिळाला. केळेकर म्हणतात, 'सर्व कोंकणीभाषक एक भाषा, एक लिपी, एक साहित्य, एक समाज या सूत्रामध्ये स्वत:ला गुंफून घेत नाहीत तोपर्यंत कोंकणीचे आंदोलन चालूच राहणार आहे' (पृष्ठ १०१) दुर्दैवाने केळेकरांचे हे पुस्तक प्रकाशित होण्याच्या सुमारासच गोव्यातील काही मान्यवर ख्रिस्ती भाषावैज्ञानिकांनी चर्चच्या साहाय्याने 'रोमी लिपी'तील कोंकणी देवनागरी लिपीतील कोंकणीपासून (म्हणजे 'हिंदू कोंकणी'पासून) वेगळी काढण्याचे प्रयत्न पुन: सुरू केले आहेत. केळेकरांसारख्या द्रष्ट्या लेखकाचा हा एका अर्थी पराभवच आहे.

लेख १८ मध्ये केळेकर म्हणतात, 'शिकल्यावाचून येथे (गोव्यात) कुणाला मराठी येत नाही. शिकल्यावर लिहिता वाचता आले तरी सरावावाचून कोणाला मराठी बोलता येत नाही. आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे मराठीतून अस्खलितपणे बोलण्याचा सराव असूनही मराठीचे दोन कट्टर पुरस्कर्ते किंवा संपूर्ण आयुष्य मराठीच्या सेवेत खर्च केलेले दोन गोमंतकीय मराठी साहित्यिक जेव्हा एकत्र येतात तेव्हा आपापसात ते चुकूनदेखील कधी मराठीतून बोलत नाहीत' (पृष्ठ १०४-१०५). केळेकरांचे हे म्हणणे अगदी संपूर्णपणे खरे आहे. परंतु मराठीचे कट्टर विरोधक असणारे गोव्यातील लेखक जेव्हा मराठीच्या विरोधात लिहितात तेव्हा ते मराठीतून लिहितात, हेही तितकेच खरे आहे; त्याचा उल्लेख करण्याचे मात्र केळेकर टाळतात. केळेकर म्हणतात, 'गोव्याच्या लोकवस्तींपैकी ३३ टक्के लोकांचा - ख्रिश्चनांचा मराठीशी कसलाच संबंध नाही.' (पृष्ठ १०७ व ११२). हे जरा ओढूनताणून आणलेले वाटते, कारण ख्रिस्ती लोकांचा मराठीशी पूर्वापार संबंध होता - अगदी फादर स्टीफन्सच्या ख्रिस्तपुराणापासून होता. मात्र पुढील काळात ख्रिस्ती लोकांनी आपले स्वतंत्र अस्तित्व दाखविण्यासाठी मराठीला परकी मानून कोंकणीचा पुरस्कार केला असे मानण्यास जागा आहे. चार्ल्स फर्ग्युसन (१९२६:६२) या विख्यात भाषावैज्ञानिकाचे मत येथे नोंदवावेसे वाटते. तो म्हणतो, 'कोंकणी निजभाषकांपैकी बहुसंख्य लोक कोंकणी ही स्वतंत्र भाषा आहे असे सध्या मानत असावेत; परंतु अशा लोकांची संख्या ख्रिश्चनांमध्ये नि:संशयपणे जास्त आहे. पोर्तुगीजांच्या गोव्यांतील साम्राज्यवादी कारवायांचा परिणाम म्हणून ख्रिस्ती धर्माचा जो प्रसार झाला, तो झाला नसता तर कोंकणीच्या स्वतंत्र भाषिक अस्तित्वाचा प्रश्न बहुधा उद्‌भवलाच नसता.'

कोंकणी-मराठीच्या वादामध्ये कोणत्याही प्रकारे डॉ० झुजे परेरा (१९७१) यांची साक्ष काढणे (पृष्ठ १०६) हे निखळ बुद्धिवादाला व तार्किकतेला धरून नाही; कारण झुजे परेरा हे नुसतेच कोंकणीचे समर्थक नाहीत तर मराठीचे द्वेष्टे आहेत. असे म्हणण्यास जागा आहे.

'कोंकणी ही एक विकसनशील भाषा आहे' (पृष्ठ ११३) 'अभिव्यक्तीच्या दृष्टीने कोंकणीची आंतरिक क्षमता कोठल्याही प्रगल्भ भाषेपेक्षा यत्किंचितदेखील कमी नाही' (पृष्ठ ११८) असे हे केळेकर म्हणतात. कोणत्याही भाषेचा साहित्यिक विकास हा प्रयत्न आणि पुरेसा वाव मिळणे यांवर अवलंबून असतो. साहित्य अकादमीने मान्यता देऊन कोंकणीला वाव मिळवून दिला (१९७६) आणि आपल्या अथक प्रयत्नांनी कोकणी लेखकांनी कोंकणी साहित्य नावारूपाला आणले आहे.

जाता जाता पुस्तकातील काही त्रुटींचा उल्लेख करावासा वाटतो.

(१) प्रागैतिहासिक काळात युरो-भारतीय भाषांची जननी अशी एक भाषा असावी असे भाषावैज्ञानिक म्हणतात. तिला प्रोटो-इन्डो-युरोपीयन (PIE) असे नाव आहे; केळेकर म्हणतात त्याप्रमाणे प्रिमिटिव्ह-इन्डो-युरोपीयन (पृष्ठ ४) नव्हे.

(२) भाषावैज्ञानिकांनी कृत्रिमरीत्या तयार करून एस्पेरान्तो ही भाषा 'प्रचलित' (पृष्ठ ८८) केली हे म्हणणे बरोबर नाही. एस्पेरान्तो ही काही मोजक्या भाषा-वैज्ञानिकांपुरतीच मर्यादित राहिली आहे.

(३) पृष्ठ ३८वर आलेले 'ध्वनिधिष्ठित (यथामूल) वर्णमाला', 'भाषेची ध्वनिव्यवस्था', 'अक्षर', 'आकृति' इत्यादी शब्द म्हणजे निश्चित स्वरूपाच्या शास्त्रीय संज्ञा आहेत. त्यांचे सोप्या भाषेत स्पष्टीकरण केलेले नसल्यामुळे सामान्य वाचकाला त्या दुर्बोध वाटण्याची शक्यता आहे.

(४) 'अहिंदी प्रदेशात - दक्षिणेकडच्या चार अन पूर्व-पश्चिमेकडल्या आठ राज्यांत - हजारो लोक हिंदुस्तानीच्या दोन्ही लिपी अन् दोन्ही 'शैल्या' (यथामूल) शिकत राहिले' (पृष्ठ ४४) हे विधान वस्तुस्थितीला धरून नाही. हजारो लोक आपल्या लिपीच्या व्यतिरिक्त नागरी आणि विशेषत: फारसी लिपी हेतुपूर्वक शिकत राहिले यावर विश्वास बसणे कठीण आहे.

(५) पुस्तकाच्या अगदी सुरुवातीला (पृष्ठ २-३) 'लोकदृष्टि (फोक व्ह्यू) भाषिक प्रश्न सोडवायला उपयोगी पडत नाही, तीवर आधारून देशाचे भाषिक नियोजन करता येणार नाही' असे म्हटले आहे, तर पुढे पृष्ठ ११वर एखाद्या बोलीला भाषा म्हणून पुढे येण्यासाठी 'लोकांची अस्मिता' हा एक महत्त्वाचा घटक म्हणून सांगितला आहे. जगात कित्येक भाषांना 'भाषा' हे स्थान केवळ लोकेच्छेमुळेच मिळाले आहे. अगदी कोंकणीलाही 'भाषे'चे स्थान मिळताना कोणा चारदोन भाषावैज्ञानिकांचे मत नव्हे तर सर्वसामान्य जनतेच्या तीव्र भावनांचा रेटाच साहाय्यभूत झाला आहे.

असे जरी असले तरी केळेकर म्हणतात, 'कोणतेही मराठी पुस्तक मूळ मराठीत वाचण्याइतके मराठी प्रत्येक गोमंतकीयाला आलेच पाहिजे' (पृष्ठ ११२). 'मराठी

आपल्याला लिहिता आलीच पाहिजे' (पृष्ठ १२९). 'ख्रिस्ती समाज मराठीशी चांगला परिचित झाला तर त्यात त्याचाही लाभ आहे आणि कोंकणीचाही फायदा आहे' (पृष्ठ ११२). मराठी व कोंकणीच्या सहयोगाविषयीची केळेकरांची आस्था हे त्यांच्या पुस्तकाचे मोठे बलस्थान आहे.

एकंदरीतच ज्या कार्याला केळेकरांनी वाहून घेतले त्याची उत्तम तऱ्हेने सांगता आता झाली आहे. पृष्ठ १३०वर ते म्हणतात, की 'कोंकणी-मराठी वादात आता मला रस नाही, या वादातून मी अंग काढून घेतले आहे,' कोंकणीच्या बाबतीत केळेकरांनी जे जे वांछिले ते ते साध्य झाले आहे. कोंकणी ही गोव्याची राजभाषा झाली आहे (१९८७). तिला साहित्य अकादमीची मान्यता मिळाली आहे. भारताच्या राज्यघटनेच्या आठव्या अनुसूचीमध्ये कोकणीचा समावेशही झाला आहे (१९९२). त्या दृष्टीने केळेकर पूर्णतः कृतार्थ आहेत. सर्वांत महत्त्वाचे म्हणजे जे 'ज्ञानपीठ पारितोषिक मिळविण्याची योग्यता गोमंतकीय साहित्यिकांमध्ये फक्त बोरकरांनाच होती' असे केळेकर म्हणतात (पृष्ठ १२९), ते ज्ञानपीठ पारितोषिक आता स्वतः केळेकरांनाच मिळाले आहे. तेव्हा त्यांनी सांगितलेली 'भाषिक संघर्षाची' कहाणी आता सुफळ संपूर्ण झाली आहे असे म्हणायला हरकत नाही.

**संदर्भ :** परेरा, (डॉ०) झुजे. १९७१. 'कोंकणी अ लँग्विज्' - **अ हिस्ट्री ऑफ कोंकणी- मराठी काँट्रोव्हर्सी.** धारवाड : कर्नाटक युनिव्हर्सिटी.

फर्ग्युसन, चार्ल्स. १९९६. 'पेपर्स ऑन लँग्विज इन सोसायटी.' समाविष्ट- **'सोस्योलिंग्विस्टिक पर्स्पेक्टिव्हज्'.** संपादक - थॉमस ह्यूनर. न्यूयॉर्क : ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस. ■

**26 बी, किशन कुंज, जीवन विकास मार्ग, विलेपार्ले (पूर्व), मुंबई** 400 057.
**दूरभाष :** (022) 2683 5689

**पुन्हा डबक्यात ?**

अस्मिता टिकवायला राडेबाज आंदोलन नव्हे, तर स्वभाषेबद्दलचा अभिमान, तिच्यासाठी कायदेशीर संस्थापनेबरोबर विकास आणि संवर्धनाचे दीर्घकालीन उपक्रम जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत करावे लागतील हे आम्हाला कळेल का ? की 'यदा यदा हि धर्मस्य'प्रमाणे शिवाजी महाराज अवतरल्याशिवाय आम्हाला काही कळणारच नाही ? नाही तर पोवाड्यात जसे झिलकरी 'जीरं जीरं जी' म्हणून री ओढतात, तसे आम्ही पुढाऱ्यांच्या भाषणाला आणि नाट्य-चित्रपटातल्या संवादांना 'टाळ्या' वाजवत पुन्हा 'डबक्यातच'च राहू, प्रवृत्तीला अस्मिता म्हणत !

लेखक : संजय पवार, दै० महाराष्ट्र टाइम्स, ९ मे ०६. प्रेषक : डॉ० मिलिंद मालशे

# जाहिरातींचे शैलीशास्त्र : निष्काळजीपणाचे दर्शन

विवेक भट

[परीक्षित पुस्तक : 'जाहिरातींचे शैलीशास्त्र'- डॉ० श्रीपाद भालचंद्र जोशी. श्री मंगेश प्रकाशन, नागपूर. २००७. पृष्ठे ३०८. किंमत रु० १५०/-]

नागपूरचे एक प्राध्यापक डॉ० श्रीपाद जोशी यांनी 'आचार्य' (पीएच०डी०?) या पदवीसाठी संशोधन करून लिहिलेला प्रबंध पुस्तकरूपाने प्रसिद्ध केला आहे. काशी हिंदु विश्वविद्यालयाचे भूतपूर्व मराठी विभागप्रमुख डॉ० सुरेश भृगुवार यांची पुस्तकाला प्रस्तावना आहे आणि ज्येष्ठ व मान्यवर भाषावैज्ञानिक डॉ० रमेश धोंगडे यांनी पुस्तकाचे एक परिशिष्ट (परिशिष्ट क्र० ३) लिहिले आहे. त्यामुळे प्रबंधाला साजेशी प्रतिष्ठा आणि भारदस्तपणा साहजिकच या पुस्तकाला लाभला आहे. त्याशिवाय आपल्या मांडणीच्या पुष्टीसाठी जोशी यांनी जाहिरातींचे असंख्य नमुने तपासले आहेत.

शैलीविज्ञान ही भाषाविज्ञानाच्या अंतर्गत असणारी ज्ञानशाखा तशी बऱ्याच अलीकडे विकसित झालेली आहे. सर्वसामान्य वापरांत असणाऱ्या भाषेपेक्षा साहित्याची भाषा वेगळी असतेच; परंतु जाहिरातींची भाषा ही त्याहूनही अधिक वेगळी असते. कारण जाहिरातीचा भर हा विक्री करायची वस्तू आणि ग्राहकाला त्या वस्तूची आवश्यकता पटवून देणे यावर असतो. मुख्यत्वे त्याच अंगाने जाहिरातीमधील भाषेची शैली तपासली गेली पाहिजे. एखाद्या जाहिरातीतील वाक्यात क्रियापद असणे किंवा नसणे ही गोष्ट खरी तर गौण आहे. जाहिरात जर ग्राहकाचे लक्ष वेधून घेत असेल, त्याच्या मनात उत्सुकता निर्माण करून त्याला वस्तू विकत घेण्यास उद्युक्त करीत असेल, तर त्या जाहिरातीचा उद्देश सफल झाला असे म्हणावे लागेल. परंतु हे जरी खरे असले तरी संशोधनात्मक प्रबंधामध्ये भाषेची संरचना, व्याकरण, अलंकारशास्त्र, सांख्यिकी समर्थन अशा सर्वच गोष्टींचा विचार झाला पाहिजे. डॉ० जोशींनी तसा सर्वांगीण विचार करून योग्य आणि पर्याप्त उदाहरणांच्या साहाय्याने तो प्रस्तुत पुस्तकात मांडला आहे. त्यामुळे जाहिरातींमधील भाषेच्या संदर्भात हे पुस्तक म्हणजे मराठीतील एक महत्त्वाचा टप्पाच ठरेल असे मानण्यास हरकत नाही.

एकंदर नऊ प्रकरणात पुस्तकाची मांडणी करण्यात आली आहे. प्रथम जाहिरातींचा इतिहास संक्षिप्त स्वरूपात मांडला आहे. दक्षिण इटलीमधील पॉम्पे या पुरातन शहरात तसेच रोमन संस्कृतीच्या काळात जाहिराती चित्रांच्या माध्यमातून केल्या जात होत्या, तेथपासून प्रथम लिखित, नंतर छापील जाहिराती अस्तित्वात आल्या. आणि अलीकडे आकाशवाणी व त्यानंतर दूरचित्रवाणीचा उदय होताच जाहिरात करण्याच्या तंत्राचा कसा झपाट्याने विकास झाला, हा सर्वच इतिहास रंजक आहे.

प्रकरण २ व ३ मध्ये जाहिरात आणि संवादप्रक्रिया यांमधील मूलभूत संबंध, जाहिरातींची निर्मितिप्रक्रिया, त्यांची सर्जनशीलता, जाहिरातींचे पाठ्यलेखन (कॉपी रायटिंग), जाहिरातींचे प्रकार व त्यांची मांडणी इत्यादी गोष्टींचे सविस्तर विवेचन आहे. 'जाहिरात हा मितव्ययी संवादप्रकार आहे' (पृष्ठ १५६) हे विधान अतिशय समर्पक आहे. 'वाङ्मय हा केवळ अभिव्यक्त होण्याकरिता असणारा संवाद आहे, तर जाहिरात हा अनुनयी संवाद आहे.' हा प्रकरण दोनच्या अखेरीस काढलेला लेखकाचा निष्कर्ष आहे. 'जाहिरात हा संवादप्रकार व जाहिरातशैली ही केवळ वस्तू व मालाची विक्री करण्याचे तंत्र म्हणूनच तेवढी उरलेली नसून जीवनाच्या विविध क्षेत्रांशी संबंधित आपले म्हणणे प्रभावीपणे मांडणारी ती शैली होऊ पाहते आहे.' (पृष्ठ ४१), 'जाहिरात ही विज्ञानदेखील आहे.' (पृष्ठ ४२) ही वाक्ये समर्पक आहेत.

शैली आणि शैलीच्या अभ्यासासंबंधी विवेचन करताना जोशी यांनी 'स्टाइलिस्टिक्स' (शैलीविज्ञान) हा शब्द कधी व कोठे अस्तित्वात आला येथपासून सुरुवात करून शैलीविषयक सात सिद्धान्त आणि त्यावरील आक्षेप यांची नोंद घेतली आहे (प्रकरण ४). त्यानंतर पाश्चिमात्य अभ्यासकांपासून ते डॉ० केळकरांपर्यंतच्या अनेक शैलीअभ्यासकांच्या विचारांची दिशा साधार दाखवून दिली आहे. ध्वनि, पदिम, शब्दनिधि, वाक्य, अर्थ या सर्वच पातळ्यांवर केलेले शैलीशास्त्राचे विश्लेषणही अभ्यासपूर्ण आहे. या पायावर आधारून जाहिरातींच्या भाषेचा सविस्तर अभ्यास करण्याचे काम जोशी यांनी प्रस्तुत पुस्तकात चांगल्या रीतीने केले आहे (प्रकरण ५). जाहिरातींमधील अनेक वाक्यांत दिसणाऱ्या क्रियापदविहीनतेचे वैशिष्ट्य (पृष्ठ ९८) त्यांनी नोंदविले आहे. 'उत्तरगर्भ प्रश्न' याचे विवेचन (पृष्ठ १०५) चांगले आहे. onomatopoeia या शब्दाचे 'अनुनादात्मक शब्द' हे भाषांतर छान आहे; परंतु पृष्ठ १३७-१३८ वर दिलेली त्याची काही उदाहरणे तेवढीशी बरोबर नाहीत. अनुनादात्मक शब्दांचा उच्चार होताना त्यातील केवळ ध्वनींवरून अर्थाचा बोध व्हायला हवा. 'रेंगाळणारीं', 'मंद मंद सुगंध', 'लखलखीत/लखलखतं', 'चोखंदळ', 'जंतुरहित' या शब्दांतील निव्वळ ध्वनींवरून अर्थाचा बोध होत नाही. तसेच 'अभ्यस्त शब्द'

(पूर्णत: किंवा अल्पांशाने पुनरावृत्त होणारे शब्द) यांचेही 'नरमादी' हे उदाहरण बरोबर नाही. (पृष्ठ १४२). पृष्ठ १५७-१५९ वर क्रियाविशेषण म्हणून नमूद केलेले 'मंद मंद सुगंध', 'विश्वासाचं बियाणं', 'मिळत्याजुळत्या रंगाच्या', 'चालत्याफिरत्या सौंदर्याचा', 'सेवा-साहाय्यही मिळेल', 'जवळजवळ ५७ वर्षांचा अनुभव', 'एवढ्याच प्रमाणांत', 'थोडंसं प्रेम' असे कित्येक शब्द क्रियाविशेषणे नाहीतच.

पुस्तकाच्या अखेरीस 'निष्कर्ष व समारोप' (प्रकरण ९)मध्ये आधीच्या सर्व प्रकरणांतील माहिती व आकडेवारी संकलित केली आहे. तसेच संख्याधिक्य आणि उपयोजनकौशल्य या दोन कसोट्या लावून मराठीतल्या जाहिरातींचा कोणकोणत्या शैलीउपायांवर विशेष भर आहे हे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. शेवटी त्यांनी दोन मुद्दे मांडले आहेत :

(१) जाहिरात हा पैसा खर्च करून, त्याकरिता जागा, वेळ विकत घेऊन साधलेला संवाद असतो, त्यामुळे किंचितशीही जागा अथवा वेळ ही अविचाराने वापरून वाया घालविणे या संवादप्रकारात शक्यच नसते (पृष्ठ २४०).

(२) जाहिरात हे प्रामुख्याने ज्या आधुनिक विपणनाचे साधन आहे त्या आधुनिक विपणनसंवादाची - 'विपणनार्थ संवादाची शैली' ठरते व त्यासाठी जाहिरातदाराने योजिलेले उपाय व्यक्तिसापेक्ष न समजता अनुनयी संवादाचे ते विपणनार्थ शैली-उपाय ठरतात. (पृष्ठ २६२).

हे मुद्दे डॉ० जोशी यांनी त्यांच्या प्रबंधात प्रभावी रीतीने सोदाहरण पटवून दिले आहेत. असे असले तरी संशोधनात्मक प्रबंध या दृष्टीने पाहता प्रस्तुत पुस्तकात पुष्कळच उणिवा दिसतात. त्यापैकी काहींचीच नोंद येथे घेणे शक्य आहे.

(१) सर्वांत मोठी उणीव जाणवते ती संदर्भसूचीबाबत.

(अ) प्रत्येक प्रकरणामध्ये जागोजागी संदर्भक्रमांक दिले आहेत आणि पुस्तकाच्या अखेरीस संदर्भक्रमांकानुसार संदर्भग्रंथांची सविस्तर सूची दिली आहे. परंतु दिलेला संदर्भ त्या विशिष्ट संदर्भग्रंथांत कोठे सापडेल तो पृष्ठक्रमांक दिलेला नाही. जिज्ञासू वाचक आणि परीक्षकही प्रत्येक संदर्भ पाहण्यासाठी तो तो संपूर्ण संदर्भग्रंथ शोधून पाहील अशी अपेक्षा करता येणार नाही.

(आ) संदर्भसूचीमध्ये काही संदर्भग्रंथांच्या बाबतीत प्रकाशनांचे स्थान दिलेले नाही. कोठे प्रकाशनवर्ष दिलेले नाही. कोठे प्रकाशकाचे नाव दिलेले नाही; तर कोठे प्रकाशनस्थान, प्रकाशनवर्ष, प्रकाशक या तिन्हींचाही उल्लेख नाही.

चार्ल्स हॉकेट यांच्या 'ए कोर्स इन मॉडर्न लिंग्विस्टिक्स' या पुस्तकाचे प्रकाशनवर्ष वास्तविक १९५८ आहे, ते संदर्भसूचीमध्ये पृष्ठ २९४ वर १९८५ असे दिले आहे.

(इ) कित्येक ठिकाणी पुस्तकात संशोधकाच्या नावासमोर दिलेले संदर्भक्रमांक संदर्भसूचीतील ग्रंथक्रमांकाशी जुळत नाहीत. उदा० पृष्ठ २१२ वर 'बोल्टन'च्या नावासमोर दिलेला संदर्भक्रमांक ९ तसेच 'रीड'च्या नावासमोर दिलेला क्रमांक १९ हे संदर्भसूचीबरोबर जुळत नाहीत. पृष्ठ २१३ वर 'लुकास' या एकाच संशोधकाच्या नावासमोर १८ आणि १५ असे दोन क्रमांक दिले आहेत, संदर्भसूचीमध्ये मात्र १५ हा एकच क्रमांक जुळतो. सर्वांत कळस म्हणजे परिशिष्ट १च्या शेवटी केवळ दोनच संदर्भग्रंथ नमूद केले आहेत आणि तरीही त्या परिशिष्टात पृष्ठ २६८, २६९ वर जागोजागी दिलेले त्यांचे संदर्भक्रमांक उलटसुलट आहेत.

पृष्ठ २४७ वर 'अँडरसन' आणि पृष्ठ २६० वर 'टर्नर' या संशोधकांच्या नावासमोर दिलेले संदर्भक्रमांक संदर्भसूचीशी जुळत नाहीत. पृष्ठ २५६ वर नमूद केलेल्या 'एनाक्रिस्ट' (यथामूल) या शैलीशास्त्रविचारकासंबंधी कोणताही संदर्भ कोठेही दिलेला नाही.

संशोधनात्मक प्रबंधामध्ये अशा चुका क्षम्य नाहीत, हे लक्षात घ्यायलाच हवे.

(२) प्रस्तुत पुस्तकामध्ये कित्येक ठिकाणी लेखकाने दिलेले अंतर्गत संदर्भही चुकीचे आहेत. उदा० पृष्ठ २९ वर 'जनसंवाद'विषयी १.८.१२ या परिच्छेदाचा संदर्भ दिला आहे; परंतु १.८.१२ हा परिच्छेद पुस्तकात अस्तित्वातच नाही. पृष्ठ १६७ वर ४.१० या छेदकाचा संदर्भ दिला आहे, तो ४.१० हा छेदक अस्तित्वात नाही. पृष्ठ २१८ वर 'अन्यधर्मारोप' यासाठी ६.३.१ या छेदकाचा संदर्भ दिला आहे, तो वास्तविक ८.३.१ असा हवा होता. पृष्ठ २६५ वर म्हटलेला ९.६.१ हाही छेदक अस्तित्वात नाही. पृष्ठ २३३ वर 'पहा ६.१७.२(२) असा एक संदर्भ दिला आहे, त्याचा वास्तवातील ६.१७.२(२) या छेदकाशी काही संबंध दिसत नाही. पृष्ठ १८५ वर ४.१२.१ या छेदकाचा संदर्भ दिला आहे तो ६.१२.१ असा हवा होता. पृष्ठ २३४ वर दिलेले महिको बियाणे (अनु० ४४), एल० ॲण्ड टी० (अनु० ४०) हे चूक आहेत, ते ४३ व ३९ असे हवे होते. त्याच पानावर 'विपुल'साठी अनु० १५१ दिला आहे, तो कोठे अस्तित्वात नाही. पृष्ठ २१६ वर दिलेला 'सुवर्णाच्या राशी' (अनु० १५) हा वास्तविक अनु० १४ असा हवा होता.

(३) लेखकाने अनेक पाश्चिमात्य विद्वानांची असंख्य अवतरणे उद्धृत केली आहेत, त्यांच्या अत्याधिक संख्येबद्दल असे म्हणावेसे वाटते की इतर विद्वानांची वा संशोधकांची अवतरणे ही संदर्भासाठी व प्रबंधाच्या भारदस्तपणासाठी आवश्यक असली तरी केवळ इतरांच्या अवतरणांचे संकलन म्हणजे स्वत:च्या मुद्यांच्या मांडणीचे समर्थन नव्हे. विशेषत: एका संशोधकाने दुसऱ्या संशोधकाचे दिलेले अवतरण उद्धृत करण्याने साध्य

तर काही होतच नाही; उलट अशी दुय्यम अवतरणे मोठ्या प्रमाणात दिल्यामुळे लेखकाने मूळ संदर्भग्रंथ स्वत: पाहिलेले नाहीत हे स्पष्ट होते. डॉ० जोशींनी अनेक ठिकाणी असे केले आहे. उदा० 'जॉर्ज बर्टन हॉचकिस याने जाहिरातलेखनाच्या शैलीचे चार प्रकार विशद केल्याचे चेसब्रो यांनी सांगितले आहे.' (पृष्ठ ५०), 'किलर कूच याने या संदर्भात न्यूमनचे नोंदविलेले मत असे...' (पृष्ठ १३२), 'चॅडबर्न असे म्हणतो असे वा० के० लेले यांनी म्हटले आहे.' (पृष्ठ १५०), 'जेकब्ज व रोझेन बॉन यांनी... असे म्हटले असल्याचे डॉ० वा० के० लेले यांनी नमूद केले आहे.' (पृष्ठ १६१), '... असे ब्रेदर्सचे म्हणणे डॉ० लेले यांनी मांडले आहे (पृष्ठ १९८), 'पीचॅम नावाच्या ग्रंथकाराने सुमारे २०० अलंकारांची यादी दिली असल्याचे डॉ० लेले यांनी म्हटले आहे.' (पृष्ठ २११), 'बेकरनेदेखील अलंकाराचे कार्याच्या आधारे नऊ प्रकार वर्णन केले आहेत असे लेले सांगतात.' (पृष्ठ २११).

(४) कोठे कोठे मूळ इंग्लिश शब्दांचे मराठी भाषांतर दुर्बोध झाले आहे. उदा० 'कोस्टलर (यथामूल) याने सर्वच कल्पक कृतींचा पाया हा एकच असतो व तो शास्त्रीय संशोधन, कलात्मकता व तिरकसपणा (?) हाच असतो असे म्हटले आहे.' (पृष्ठ ४२), 'वेब्स्टरने म्हटल्याप्रमाणे उत्तम जाहिरात ही बोलली पाहिजे, तिने ग्राहकाच्या दृष्टीने बघितले पाहिजे, ती हळुवार (?) असली पाहिजे.' (पृष्ठ ४७).

'लोन वर्ड्स'चे मराठीत भाषांतर 'उसने शब्द' किंवा 'उसनवारीने घेतलेले शब्द' असे रूढ आहे. त्याऐवजी 'दत्तक शब्द' (पृष्ठ १३५-१३६) असे वेगळे भाषांतर मुद्दाम करण्याची जरुरी नव्हती व ते भाषांतर बरोबरही नाही. 'लोन ब्लेंड्स'चे भाषांतर 'अपभ्रष्ट शब्द' (पृष्ठ १३६) हेही बरोबर नाही.

काही ठिकाणी एकाच इंग्लिश पदबंधाचे भाषांतर सोयीनुसार वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळे केले आहे. उदा० 'युनिक सेलिंग प्रपोझिशन्स' याचे भाषांतर पृष्ठ ४४वर 'विक्रीनुकूल यथायोग्य वैशिष्ट्ये' असे केले आहे, तर पृष्ठ ४६ वर 'विशिष्ट विक्री सूत्र' असे केले आहे, आणि तरीही मूळ पदबंधाचा सम्यक् अर्थ दोन्ही ठिकाणी आलेला नाही.

(५) काही ठिकाणी सदोष वाक्यरचनेमुळे दुर्बोधता आली आहे. उदा० 'न व्यापलेली लोकसंख्या माध्यमांनी व्यापण्याचे प्रयत्न विकसित तंत्रज्ञानाने सुकर करण्याचा प्रयत्न चालविला आहे.' (पृष्ठ १९). 'शिवाय ज्याला दुधावर वेगळा खर्च न करणे याची सोय होत (?) व ज्याला गरज वाटेल त्याने आवश्यकतेनुसार दुधात मिसळायलाही हरकत नाही.' (पृष्ठ १७९). 'विशिष्ट ब्रँडचा वापर अनुकूल वृत्तीने करणाऱ्यांची संख्या ही विशिष्ट छापाचीच वस्तू न वापरणारे किंवा ती अगोदर वापर

करून झालेल्यांना कितीतरी अधिक होती.' (पृष्ठ ३५). 'अलंकाराच्या मदतीने एखादी अनाकलनीय गोष्ट आकलनीय करता येते, विरंगुळा मिळवून देता येते.' (पृष्ठ २१०). 'विशिष्ट भोगाची तृष्णा ही विशिष्टच कंपनीची विशिष्ट (ब्रँड) उत्पादन कसे भागवू शकते' (पृष्ठ २५५). 'कंसातील आकडे वारंवारिकतेची निदर्शक आहेत.' (पृष्ठ २५७).

अनेक ठिकाणी वाक्ये फार मोठी झाल्यामुळेही अर्थ समजण्यात अडथळा येतो. उदा० पृष्ठ २४३ वरील काही वाक्ये. काही शब्दांचे अर्थ प्रचलित मराठी भाषेत तरी नीट समजण्यासारखे नाहीत. उदा० 'त्यानंतर N.B. किंवा टीप देण्याची पद्धत प्रचारात होती. तसेच आकृत्या किंवा त्याचे कापदेखील,' (पृष्ठ ५८).

(६) लेखकाला नवनवीन शब्द तयार करून वापरण्याची हौस दिसते. नवीन शब्द घडविण्याच्या उत्साहात 'प्रत्येक बाब संवादतेच' (पृष्ठ २९) यासारखी शब्दयोजनाही आली आहे. 'जाहिरातेय' वस्तू हा डॉ० जोशींचा फार आवडता शब्द. तो पुस्तकात पुष्कळ वेळा आला आहे. मात्र कोठे कोठे तो 'जाहिरातीय' असाही येतो (पृष्ठ २१५,२५५). 'ग्राहकीय' जाहिरात हा असाच एक शब्द. तेव्हा असे नवे शब्द निदान अवतरण चिन्हांत द्यायला हवेत.

(७) पुस्तकातील मुद्रणदोषांची संख्या तर अगणित म्हणावी लागेल. इंग्लिश शब्दांच्या स्पेलिंगमध्ये अनेक चुका झालेल्या आहेत. मराठी शब्दांतही मुद्रणदोष खूप आहेत. विशेषत: शिरोबिंदू/अनुस्वार हे चिन्ह चुकीच्या ठिकाणी पडलेले किंवा अजिबात न पडलेले असे अनेकदा दिसते.

वरील विवेचनावरून प्रबंधाने 'काय गमावले आहे' याची पुरेपूर कल्पना येतेच. पण मजेची गोष्ट म्हणजे प्रस्तुत पुस्तकात डॉ० जोशी स्वत:च असे म्हणतात की ''भाषिक व्यवहारांत भाषिक नियमांचे उल्लंघन हे सदोष मानले जाते. एवढेच नव्हे तर तसे केल्यास त्या त्या प्रयुक्तिक्षेत्रांतील संवादव्यवस्थाच कोलमडून पडते व निरर्थकता व गोंधळ वाट्याला येतो'' (पृष्ठ २६१). तेव्हा यानंतर पुस्तक परीक्षणात आणखी वेगळी टीकाटिप्पणी करण्याची खरोखर आवश्यकता आहे का?

■

**26 बी, किशन कुंज, जीवन विकास मार्ग, विलेपार्ले (पूर्व), मुंबई** 400 057.
**दूरभाष :** (022) 2683 5689

# 'भानवस' आणि 'जेवण करणे'

ब्रह्मानंद देशपांडे

१

'भाषा आणि जीवन'मधील (वर्ष २७, अंक १, हिवाळा २००९) श्री० अनिल शेळके यांचा 'हे ही स्वयंपाकघरातून अदृश्य झाले आहेत.' हा लेख (पृ० ७६-७७) मनोरंजक वाटला. मीही माझे मानलेले भाऊ (कै०) मंगलदादा जैन पंचवाटकर यांच्या घरी पानाला वटकन लावून जेवलो आहे. ब्राह्मण मात्र वटकन वापरत नसत. ते खरकटे होईल ना!

मात्र उतरंडीखालच्या चिखलाच्या गोलाकार आधाराला 'भानवस' म्हणत असत हे विधान योग्य वाटत नाही; कारण भानवस म्हणजे चूल. हा अर्थ सर्वत्र आढळतो (लीळाचरित्र, उत्तरार्ध लीला क्र० ५७५) चूल भानवस असा जोडशब्दही येतो. स्मृति-स्थळात नागदेवाचार्यांच्या मुखी 'महात्मा चुली भानवसी न घलाविया' असे येते. (स्मृती क्र० ४१) माझ्या घरी माझा विद्यार्थी राजेंद्र भानुसे हा राहतो. त्याला शाळेत (एकतुनी, तालुका पैठण, जिल्हा औरंगाबाद) 'ए चूल भानुशा' असे चिडवीत असत. स्वयंपाकघराला भानवसघर म्हणतात. त्यावरून भानोस घर - भानोसा - भानुसा अशी रूपे होतात. हिंदीतही स्वयंपाकघराला भनसाघर म्हणतात. (फणीश्वरनाथ 'रेणु' मैला आँचल, पृ० १५ आणि तळटीप) मासरुळ (तालुका चिखली, जिल्हा बुलढाणा) येथील एका ब्राह्मणाच्या भानवसाचा उल्लेख लीळाचरित्रात (पूर्वार्ध लीळा ४२४) येतो.

'भानवस' हा शब्द 'महानस'पासून आला असावा. 'समानौ रसवत्यां तु पाकस्थानमहानसे' असे अमरकोशात आहे (द्वितीय खंड, वैश्यवर्ग १७६०).

शिंदखेडराजा (जिल्हा बुलढाणा) हे जिजाऊ मातेचे माहेर. लखुजीराजे जाधव (जाधवराव) हे त्यांचे वडील. त्यांची समाधी (छत्री) गावाबाहेर आहे. जाधवांचे मूळ आडनाव भानवसे. ते समाधीच्या दर्शनी भागावरील लेखात येते. लेख असा : 'सिंदखेडचे देशमुख भानवसे विठोजी सौ० आरधांगी ठाकराई राणी त्याचे पोटी जाधवराव लुकजी महाराज आरधांगी गिरजाई राणी त्याचे पोटी पुत्र दत्ताजी अंचलजी व रघुजी राजे जाधवराव, लुकजी पुत्र दत्ताजी याचे पोटी यशवंतराव राजे लिंबाजी'.

याच भानवसे आडनावाचा उल्लेख उत्तरेकडील दरवाजावरील लेखातही आहे.

२

याच अंकात श्री० क० कृ० क्षीरसागर यांचा 'दुर्दशनी मराठी' हा लेख (पृष्ठ ७७) आहे. त्यात दूरदर्शनवरील 'जेवण करिते' (स्वयंपाक करते) या प्रयोगावर रोख आहे. पण ग्रामीण भागात 'जेवण करणे' हा प्रयोग स्वयंपाक करणे या अर्थी रूढ आहे. मला तो 'सण वर्षाचा आज दिवाळी । आज राहू या उद्या सकाळी । जेवण करिते पुरणाची पोळी । भात मी घातलाय रांधायला हो । येऊ तशी कशी मी नांदायला।' या प्रख्यात लावणीत गवसला.

**संदर्भ :**


(१) लीळाचरित्र. आवृत्ती तिसरी, संपा० वि० भि० कोलते. विश्वशांती प्रकाशन, औरंगाबाद. १९९७.

(२) स्मृतिस्थळ. आवृत्ती दुसरी, संपा० वा० वा० देशपांडे. व्हीनस प्रकाशन, पुणे. १९६०.

(३) मैला आँचल. संस्करण ग्यारहवाँ, फणीश्वरनाथ 'रेणु' राजकमल प्रकाशन, दिल्ली. १९८०.

(४) हे शिलालेख मी १९६५ साली स्वत: वाचले आहेत. ■



'ऐतिहासिक', 14, अनुपम वसाहत, श्रेयनगर, औरंगाबाद 431 005.

दूरभाष (0240) 233 6606 भ्रमणभाष 098900 00614


## परीक्षणासाठी आलेली पुस्तके

☐ **'सोळा भाषणे'** - भालचंद्र नेमाडे. लोकवाङ्मय गृह प्रकाशन, मुंबई. पृष्ठे २३१. किंमत २२५ रु०

☐ **'श्री कुलशेखर सूक्त'** - अनु० डॉ० न० ब० पाटील. अनंताचार्य इंडॉलॉजिकल रिसर्च इन्स्टिट्यूट, मुंबई. २००९. पृष्ठे ५६. किंमत ६० रु०

☐ **'भाषिक भ्रमंती'** - डॉ० हरिश्चंद्र बोरकर. तारा प्रकाशन, साकोली. २००८. पृष्ठे २२८. किंमत २२५ रु०

☐ **'अक्षर २००८-०९' (मराठी प्रयोगिक नाटक विशेषांक)** - संपा० डॉ० अरुण प्रभुणे. अखिल भारतीय मराठी महामंडळ, औरंगाबाद. पृष्ठे १२३. किंमत १०० रु०

☐ **'मुंबई डिइंटेलेक्युअलाइज्ड' (राइज अँड डिक्लाइन ऑफ अ कल्चर ऑफ थिंकिंग)** - डॉ० अरुण टिकेकर. प्रोमिला अँड कं० इन असोसिएशन विथ बिब्लिओफाइल साउथ एशिया, न्यू दिल्ली व शिकागो. पृष्ठे २०६. किंमत २२५ रु०







# आता सगळा संक्षेपच

विजय पाध्ये

डॉ० द०भि० कुलकर्णी ह्यांनी 'शब्दसंक्षेप, वाक्यसंक्षेप' ह्या शीर्षकाने दिलेल्या प्रतिसादाने (दिवाळी अंक २००८) छान मनोरंजन झाले. त्या संदर्भात मला असे सांगावेसे वाटते, की नवीन पिढीला जेथे जेथे विस्तार अकारण झाला आहे असे वाटते, तेथे तेथे संकोच करून आपली भूमिका, दृष्टी आटोपशीर करावीशी वाटते. लेखनाच्या बाबतीत आता ही संक्षेपीकरणाची प्रवृत्ती वाचकाच्या, समाजाच्या अंगाने गैरसोयीची व अपायकारक आहे की नाही हे काळच ठरवू शकेल. कारण सार्वजनिक व्यवहाराच्या मुख्य नाड्या आज मोबाईल फोनमध्ये गुंतवल्या गेल्या आहेत आणि माणसाचे इथून पुढचे सगळे जीवनच त्या इवल्याशा यंत्रावर अवलंबून राहणार आहे. बोलायचे ते मुद्यापुरते (कारण आता फोनचे बिल पूर्वीसारखे किती मिनिटे बोलणे झाले ह्यावर आकारले जात नसून किती सेकंद बोलणे झाले त्यावर आकारले जाते); लिहायचे ते एसएमएसमधून (एसएमएस - शॉर्ट मेसेजिंग सर्व्हिस - थोडक्यात संदेश द्या)! बोलायला-ऐकायला फार वेळ नाही आणि लिहिण्यासाठी उपलब्ध असलेली जागा ऐसपैस नाही, हा महत्त्वाचा संदेशही अत्यंत आटोपशीरपणे, संक्षेप करूनच त्या इवल्याशा यंत्राने समाजाला देऊन टाकला आहे.

आमच्या पिढीला आज ह्या माध्यमातून दिले जाणारे संदेश नेमके कळायला जड जात आहे, पण सवयीने आम्ही रुळून जाऊ. asap, Gr8 असले शब्द जेव्हा एसएमएसमधून यायला लागले तेव्हा मला सुरुवातीला काही बोधच होईना. मग जिने हे संदेश मला पाठवले होते त्या माझ्या मुलीला मी फोन करून तिला नेमके काय म्हणायचे आहे ते विचारले, तेव्हा तिने 'ॲज सून ॲज पॉसिबल' आणि 'ग्रेट'ची ही लघुरूपे असल्याचे सांगितले. अन् नंतर माझ्या अभ्यासासाठी काही संकेतस्थळांची नावेही सांगितली. दभिंसकट तमाम आधीच्या व आजच्या पिढ्यांनी ह्या संक्षेपांशी जुळवून घेतले पाहिजे असेच जणू ती सांगत होती!

पण संक्षेपीकरणाची ही व्यथा मला नागपूरचे ज्येष्ठ प्राध्यापक डॉ० अ०द० वेलणकर ह्यांच्या भाषणाचे जे मुद्रित स्वरूप* वाचनात आले त्यातही आढळली. त्यांनी

म्हटले आहे :

''दूरचित्रवाणीच्या ठळक बातम्यांसारखी क्रियापदे अध्याहृत ठेवणारी भाषिक धाटणी पाठ्यपुस्तकांमध्ये स्वीकारणे खरोखरच आवश्यक आहे का? ''वि०वा० शिरवाडकर या नावाने नाट्यलेखन. कुसुमाग्रज या नावाने कवितालेखन... हे अमुक पुरस्काराने सन्मानित'' अशा परिचयात क्रियापदे कुठे आहेत? स्वपरिचयात किंवा आवेदनपत्रात असते तशी त्रोटक धाटणी लेखक-परिचयात नसावी. कॉम्प्युटर युगात विद्यार्थ्यांचे उद्‌गार भोवताली ऐकू येतात : ''ए तू सप्लीला बसली का ? मी रिव्हॅलला टाकलंय. ॲडमी घेतली का? कोणत्या विषयात एम०ए० करतेस, मी एम०लिट०मध्ये एम०ए० करतो आहे...'' बघा, आपला विद्यार्थी हल्ली बी०ए०ला मराठी साहित्य किंवा मराठी वाङ्मय हा विषय घेत नाही, तो एम०लिट० घेतो आणि एम०लिट०मध्येच एम०ए० करतो. म्हणून त्याला या लेखक-परिचयांमधूनदेखील भाषा 'शिकवणे' निकडीचे झाले आहे. पुढे एम०ए०च्या वर्गात व्याकरण शिकवताना क्रियापदाचे महत्त्व त्याच्या गळी उतरत नाही. 'क्रियापद हा वाक्याचा आस आहे' या वाक्याचा त्याला बोध होत नाही.''

आता संक्षेपचिन्हाबाबत : दर्भिनी, कटाक्षाने संक्षेपचिन्ह (०) वापरणाऱ्या ज्या ज्या 'चोखंदळ लेखक-मुद्रकां'चा गौरव केला आहे त्यात श्री०पु०भागवत ह्यांचे नाव अग्रस्थानी असेल असे मला वाटते. श्रीपुंनी 'मौज'च्या ज्या ज्या प्रकाशनांमध्ये लक्ष घातले त्या त्या सर्व प्रकाशनांमध्ये आणि श्रीपुंनंतरच्या पिढ्यांच्या 'मौज' प्रकाशनांमध्ये हे संक्षेपचिन्ह निरपवाद योजलेले आढळून येते. मराठीमध्ये पूर्णविराम व संक्षेपचिन्ह ह्यातील वेगळेपणा सहज दर्शविता येणारे हे वैशिष्ट्य इंग्लिशमध्ये नाही, म्हणून मला आपल्या भाषेविषयी असलेला 'पूज्यभाव' द्विगुणित झाला आहे. द०न० गोखले ह्यांच्या 'शुद्धलेखन विवेक'मधील 'परिवर्धित नियम' ह्या प्रकरणात 'पोकळ टिंब शब्दसंक्षेप दर्शवते' असे म्हटले असून त्यापुढे रु० = रुपये, प्रा० = प्राध्यापक, डॉ० = डॉक्टर, लो० = लोकमान्य अशी उदाहरणे दिलेली आहेत. ■

4, चित्रा 'बी', विद्यासागर सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037.

**दूरभाष :** (020)2421 1951; **चलभाष :** 098220 31963 E-mail: v.padhye@gmail.com

***संदर्भ :** मराठीच्या अध्यापनाची विचारसूत्रे, संपादक : डॉ० राजेंद्र नाईकवाडे, प्रकाशक : विजय प्रकाशन व राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ मराठी प्राध्यापक परिषद, नागपूर. प्रस्तुत लेखनांश डॉ० अ०द० वेलणकर ह्यांनी मराठी प्राध्यापक परिषदेच्या नागभीड येथे सन २००१ मध्ये झालेल्या बाराव्या अधिवेशनाचे अध्यक्ष ह्या नात्याने केलेल्या भाषणलेखनातून उद्धृत केला आहे. ■

# कानामागून आली...

विजय पाध्ये

दिवाळी २००८च्या अंकात प्रसिद्ध झालेला, विद्या प्रभुदेसाईलिखित 'भाषेतील म्हणींचे संचित' हा लेख रंजक व उद्‌बोधक आहेच. त्यात उल्लेख केलेल्या 'कानामागून आली आणि तिखट झाली' ह्या म्हणीचे मूळ 'पानामागून आली' असे हवे हे जे त्यांनी नमूद केले आहे ते बरोबरच व त्यापुढच्या 'मिरचीच्या गुणधर्मांचा' जो संदर्भ दिला आहे त्यावरून सिद्धच होते. परंतु माझ्यापाशी आणखीही एक संदर्भ आहे, तो मला नमूद करावासा वाटतो. 'कानामागून आलेली' असाही एक शब्दप्रयोग प्रचलित आहे अन त्याचे मूळ जनावरांच्या अवयवांमध्ये सापडते. जनावरांना आधी कान येतात व नंतर शिंगे येतात. पण ही मागाहून आलेली शिंगेच जनावरांच्या संरक्षणासाठी उपयुक्त ठरतात, त्यामुळे त्यांचे महत्त्व जास्त मानले जाते. शिवाय, नंतर फुटलेली शिंगे कानांपुढे 'शिरजोरी' करतात व कान मागे पडतात ही वस्तुस्थितीही 'कानामागून आलेली' ह्या शब्दप्रयोगाचे शब्दशः खरे रूप दाखवते! ■

4, चित्रा 'बी', विद्यासागर सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037.
**दूरभाष :** (020)2421 1951; **चलभाष :** 098220 31963 E-mail: v.padhye@gmail.com

## चुकीची दुरुस्ती

वर्ष २७ : अंक १, हिवाळा २००९

| पृष्ठ | परिच्छेद | ओळ | चूक | बरोबर |
|---|---|---|---|---|
| ३ | १ | १ | लिहिलेल्या | लिहिलेले |
| ४४ | पहिला | ६ वी | ''मे''. | ''मे'', |
| ४४ | पहिला | ७ वी | भाषांतरपण | भाषांतर ''पण''. |
| ४५ | तिसरा | दुसरी | ओसवाल | ओसवाल्ड |
| ४५ | शेवटचा | दुसरी | q - r | q → - r |
| ४५ | शेवटचा | तिसरी | (= r काही) | (= r नाही) |
| ४६ | (७)III | (अ) | य | छगन |
| ४७ | पहिला | पहिली | क्ष | जगन |
| ५१ | शेवटून दुसरा संदर्भ | | connecteures | connecteurs |

# ‘पुरसीस’, ‘पुसाईन जजेस’ आणि ‘ळ’

सत्त्वशीला सामंत

**संदर्भ :** श्री० असीम सरोदे यांचा ‘मानवी हक्कांची भाषा’ (उन्हाळा २००९ : अंक २) हा लेख.

(१) ‘पुरसीस’ किंवा ‘पुरशीस’ याचा दोन महत्त्वाच्या कोशांमध्ये पुढीलप्रमाणे अर्थ दिला आहे :

मोल्सवर्थ : questioning or interrogating; examination (of parties or evidences in a court)

य० रा० दाते यांचा ‘महाराष्ट्र शब्दकोश :

(१) चौकशी, विचारणा

(२) जबानी

(३) सर्व पक्षांचे म्हणणे विचारून लिहिलेला कागद; जबाबाचा कागद, कैफियत.
(क्रि० घालणे, पाडणे, करणे, लावणे)

थोडक्यात, ‘पुरसीस’ म्हणजे ‘interrogatories’ हा शब्द ‘पुर्सिश’ = पूछ-ताछ’ या फारसी शब्दावरून आला आहे व त्याचा वांशिक संबंध ‘पृच्छा’ या संस्कृत शब्दाशीही जोडता येईल.

(२) माझ्या समजुतीप्रमाणे ‘पुसाईन जजेस्’ असा शब्दप्रयोग नसून, तो puisne judges असा आहे. ‘puisne’ याचा उच्चार ‘pyune = प्यूनी’ असा असून, त्याचा अर्थ inferior in rank असा आहे. हा शब्द इ०स० १६८८ पासून इंग्लिश लॉमध्ये प्रचारात आला, असे वेबस्टरचा शब्दकोश सांगतो.

(३) श्री० प्रमोद पडवळ यांच्या हिंदी-मराठी-विषयक लेखाच्या संदर्भात : इंदूरच्या ‘नयी दुनिया’मध्ये एका वाचकाचे पत्र आले होते व त्याने पाठपुरावा केला. त्यामुळे आता हिंदी भाषकांनी ‘ळ’ला मान्यता दिली असल्याचे वृत्त मला श्री० शरद जोशी यांनी कळवले आहे.

■

16, यशोदाकुंज सोसायटी, 332, तेजसनगर, कोथरूड, पुणे 411 038.
दूरभाष : (020) 2538 3755

# न्यायालयांचे निकाल मराठीतून

जानेवारी ते डिसेंबर २००८ या वर्षभराच्या काळात महाराष्ट्रातील तालुका व जिल्हा पातळीवरील न्यायालयांनी एक लाखांहून अधिक फौजदारी आणि दिवाणी प्रकरणांचे निकाल मराठीतून दिले. (मात्र यात बृहन्मुंबईतील न्यायालयांचा समावेश नाही.)

या आकडेवारीनुसार गेल्या वर्षभरात एकूण १,०७,३१३ प्रकरणांचे निकाल मराठीतून दिले गेले. यातही फौजदारी खटल्यांची संख्या (८७,६९५) दिवाणी प्रकरणांपेक्षा (१९,७१८) सहापटींहून अधिक आहे. या लाखभर मराठी निकालांमध्ये तालुका पातळीवरील कनिष्ठस्तर दिवाणी न्यायाधीशांनी व प्रथम वर्ग न्यायदंडाधिकाऱ्यांनी दिलेल्या मराठी निकालपत्रांचे प्रमाण सुमारे ९५ टक्के म्हणजे ९५,२५८ एवढी आहे.

या कनिष्ठ न्यायालयांच्या तुलनेत प्रधान जिल्हा न्यायाधीश, जिल्हा न्यायाधीश व हंगामी जिल्हा न्यायाधीश या वरिष्ठ स्तरांवरील न्यायाधीशांनी दिलेल्या मराठी निकालांची संख्या अगदीच कमी म्हणजे जेमतेम ३,९३१ एवढी आहे. यातही औरंगाबाद, चंद्रपूर आणि सिंधुदुर्ग या जिल्ह्यांमधील या वरिष्ठ स्तरावरील न्यायाधीशांनी एकही निकाल मराठीतून दिला नाही!

जिल्हानिहाय विचार केला तर अमरावती (५६४२), पुणे (५२४२), वर्धा (५२६३) व यवतमाळ (५०१३) हे प्रत्येकी पाच हजाराहून अधिक निकाल मराठीत देणारे जिल्हे सर्वात आघाडीवर आहेत. भंडारा, चंद्रपूर, धुळे, जळगाव आणि नागपूर या जिल्ह्यांनीही गेल्या वर्षभरात प्रत्येकी चार हजारांहून अधिक मराठी निकालपत्रांचा पल्ला ओलांडला आहे. अकोला, बुलडाणा, गडचिरोली, कोल्हापूर, नाशिक, रायगड, सातारा आणि ठाणे हे जिल्हे प्रत्येकी तीन हजारांहून अधिक मराठी निकालांच्या वर्गात मोडतात. दोन हजारांहूनही कमी प्रकरणांचे मराठी निकाल दिले गेलेल्या जिल्ह्यांमध्ये जालना, लातूर, नांदेड, उस्मानाबाद, सिंधुदुर्ग आणि सोलापूर यांचा समावेश होतो.

[राज्यातील जिल्हा-स्तरापर्यंतच्या कनिष्ठ न्यायालयांची कामकाजाची अधिकृत भाषा मराठी असेल, अशी अधिसूचना राज्य सरकारने ३१ जुलै १९९८ मध्येच काढली आहे.] ■

'दै० लोकसत्ता', दि० ७ मार्च २००९



अनुक्रमणिका

# इन्स्टिट्यूट फॉर ट्रान्सलेशन स्टडीज

एप्रिल २००२मध्ये या संस्थेची स्थापना झाली. सध्या तिच्या अध्यक्षा डॉ० निरुपमा असून प्रा० एल०एस० शेषगिरी राव, प्रा० जी० वेंकटसुबय्या व बी०आर० रवींद्रनाथ हे संस्थेचे सल्लागार आहेत. संस्थेकडे सुमारे एक हजार अनुवादक असून संस्थेला कर्नाटक व अन्य राज्यांतील मान्यवर व्यक्तींचा पाठिंबा आहे. संस्थेच्या कामात पुढील गोष्टींचा समावेश आहे :

(१) भाषांतराचे शिक्षण व प्रशिक्षण
(२) भाषांतराबाबत संशोधन व विकास कार्यक्रम
(३) अनुवादकांसाठी वेळोवेळी कार्यक्रम
(४) अनुवादकांना विविध प्रकारे साहाय्य
(५) अधिकृततेच्या व गुणवत्तेच्या प्रमाणपत्रांचे वितरण
(६) निवडक बाबतीत अनुवाद-सेवा

संस्था देत असलेल्या अनुवाद-सेवांमध्ये पुढील गोष्टींचा समावेश होतो :

(१) अनुवादकांशी संपर्क (२) पुस्तकांचे अनुवाद (३) अनुवादांची तपासणी व मुद्रित-संशोधन (४) गुणवत्तेच्या समस्यांची सोडवणूक (५) योजनेतील अनुवादकांसाठी प्रशिक्षण-कार्यक्रम (६) अनुवाद-प्रक्रियेच्या संगणकीकरणाला पाठबळ.

याशिवाय शब्दकोश व प्रतिशब्द तयार करताना उपयुक्त ठरेल अशा 'शब्दकोश' नावाच्या सॉफ्टवेअरची निर्मिती केली गेली आहे. विविध मुदतींचे व प्रकारचे वीस अभ्यासक्रम संस्था चालवते आणि दरमहा एक बातमीपत्र प्रसिद्ध करते. स्थानिक वृत्तपत्रांत अनुवादासंबंधीचे सदरलेखनही संस्था करते. राज्य व केंद्र सरकारांना अनुवाद-सेवा पुरवण्याचे कामही संस्था करते. विशेष म्हणजे भ्रमणभाष-सेवा पुरवणाऱ्या कंपन्यांसाठी संस्थेने एकाक्षरी व दोनअक्षरी शब्दकोश संस्थेने तयार केले आहेत.



पत्ता : 338/1, 12th Main, 38th Cross, 3rd Block, Rajajinagar, Bangalore 560 010. दूरभाष/फॅक्स : (080) 2311 1467; ईमेल : its@tarjume.com
संकेतस्थळ : www.tarjume.com आणि www.anuvadak.com



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-दिन : २००९

'महाराष्ट्र अभ्यास परिषदे'ने १ मे २००९ रोजी एस०एम० जोशी सभागृहात महाराष्ट्र दिनाचा कार्यक्रम आयोजित केला होता. या वर्षीच्या साहित्य अकादमी पुरस्काराचे मानकरी श्री० श्याम मनोहर यांचा सत्कार, त्यांचे व्याख्यान आणि त्यांच्या हस्ते महाविद्यालयीन नियतकालिक स्पर्धेचे पुरस्कार-वितरण असा हा कार्यक्रम होता. परिषदेचे अध्यक्ष प्रा० प्र० ना० परांजपे यांच्या हस्ते पुष्पगुच्छ देऊन श्री० श्याम मनोहर यांचा सत्कार करण्यात आला.

महाविद्यालयीन नियतकालिक स्पर्धेच्या एक परीक्षक सौ० विजया चौधरी यांनी हे पुरस्कार जाहीर केले :

| | | |
|---|---|---|
| शहरी विभाग | - प्रथम क्रमांक | - शासकीय तंत्रनिकेतन, पुणे |
| | - द्वितीय क्रमांक | - अण्णासाहेब मगर महाविद्यालय, पुणे |
| ग्रामीण विभाग | - प्रथम क्रमांक | - कला, वाणिज्य महाविद्यालय, हुपरी |

आपल्या मनोगतात स्पर्धेला मिळालेल्या अल्प प्रतिसादाबद्दल त्यांनी खंत व्यक्त केली. या वार्षिक अंकांत ललितेतर लेखांवर विशेष भर असल्याचे सांगून शासकीय तंत्रनिकेतनच्या वार्षिक अंकात विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण सहभागाबद्दल त्यांनी विद्यार्थ्यांचे अभिनंदन केले. हुपरीच्या महाविद्यालयाच्या मुखपृष्ठाचाही त्यांनी खास उल्लेख केला.

या वेळी क्षिप्रा आंग्रे (विद्यार्थी प्रतिनिधी, शासकीय तंत्रनिकेतन, पुणे), प्रा० आनंद महाजन (अण्णासाहेब मगर महाविद्यालय, पुणे) आणि प्रा० देवानंद सोनटक्के (कला, वाणिज्य महाविद्यालय, हुपरी) यांनी आपली मनोगते मांडली. नियतकालिक तयार करताना आलेले अनुभव सांगून, पुरस्कार देऊन प्रोत्साहन दिल्याबद्दल 'मराठी अभ्यास परिषदे'चे त्यांनी आभार मानले.

यानंतरचे 'साहित्य संशोधनाची भाषा' या विषयावरचे श्री० मनोहर यांचे व्याख्यान म्हणजे उपस्थित श्रोत्यांना सकस, कसदार, अभ्यासपूर्ण भाषणाची मेजवानीच होती. 'सामान्य' माणूस आणि 'असामान्य' माणूस हे शब्द-परस्पर विरुद्ध नसून - परस्पर पूरक असायला हवेत. सामान्यापेक्षा थोडे अधिक गुण साहित्यिकात असल्यामुळे तो असामान्य होतो. सामान्य/असामान्य या सगळ्यांचीच भाषिक संपन्नता मोजण्याची

आवश्यकता आहे. शब्दसाठा, शब्दांची अचूक निवड, वेगवेगळ्या रचना करता येणे इत्यादि निकषांवर भाषिक संपन्नतेचं मोजमाप करता येईल, असं श्याम मनोहर म्हणाले.

साहित्यिकाला भाषेचा दृश्य परिणाम साधायचा असतो. सामान्य माणूस आणि साहित्यिक यांच्यातला फरक स्पष्ट करताना श्री० श्याम मनोहर म्हणाले, एखाद्या दृश्याचा समग्र परिणाम आपल्यावर होत असतो. पण एकामागोमाग येणाऱ्या शब्दांतून, वाक्यांतून ते दृश्य जिवंत करण्याचं, त्या दृश्याचा योग्य तो परिणाम साधण्याचं आव्हान साहित्यिकापुढे असतं. चांदण्या रात्रीचं सौंदर्य दोन-तीन तास मला भुलवत असेल तर वाचकालाही दोन-तीन तास भुरळ पडेल असं चांदण्या रात्रीचं वर्णन मी (साहित्यिक) करू शकतो का? हे असं वर्णन केवळ त्या चांदण्या रात्रीचं वर्णन असेल की मी/माझं इत्यादि व्यक्तिगत विकार त्याला जडत असतील? साहित्यिकाला शब्दांची अचूक निवड करणं गरजेचं असतं. त्यासाठी त्याला भाषेशी भाषेतूनच 'खेळता' आलं पाहिजे. प्रसंगी नवीन शब्द तयार करण्याचं कसबही त्याच्या अंगी असायला हवं.

संशोधनाची भाषा ही पाश्चात्त्यांकडून आपल्यापर्यंत आली आहे असं सांगून पुढं ते म्हणाले, की ''संशोधनातल्या संकल्पनांसाठी मराठी प्रतिशब्द तयार करताना भाषेचा स्वभाव, प्रवाहीपणा व अर्थसुलभता या गोष्टी लक्षात घेतल्या पाहिजेत. बोलीभाषेचा वापर करून संशोधनाची भाषाही सहज-सोपी वाटेल अशी करायला हवी. भाषा हे उपकरण म्हणून वापरून नवीन ज्ञान मिळवायला हवं. संशोधनातली नवीन ज्ञानक्षेत्रे सतत शोधली गेली पाहिजेत.'' शेवटी साहित्य-संशोधनाच्या भाषा मुख्य प्रवाहात आणण्याची गरज त्यांनी व्यक्त केली.

अध्यक्ष श्री० प्र० ना० परांजपे यांनी समारोप केला. कार्यवाह प्रा० आनंद काटीकर यांनी कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले. शेवटी सर्वांचे आभार मानले. ■

**बी-8, शिव-अमृत सहकारी गृह रचना, स्वरनगरीजवळ, आनंदनगर, पुणे 411 051.**

**दूरभाष : (020) 2434 8688**

## लेखक-परिचय

- जयश्री आनंद **काटीकर :** पुणे विद्यापीठातून मराठी विषयात एम.ए., मॅकमिलन इंडियामध्ये उपसंपादक (१९९९ ते २००२) व संपादक (२००२ ते २००४) म्हणून काम केले.

- डॉ० द०भि० **कुलकर्णी :** पीएच०डी०(मराठी), रशियन भाषेतील पदविका, नागपूर विद्यापीठातून मराठीचे प्रोफेसर व विभागप्रमुख म्हणून निवृत्त. एकतीस प्रकाशित ग्रंथ. पीएच०डी० पदवीसाठी २५ विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. अनेक पारितोषिके व सन्मानांचे मानकरी. मान्यवर शिक्षक.

- डॉ० विजया **देव :** भाषाविज्ञानात एम०ए०,पीएच०डी०,मराठीमध्येही एम०ए०, पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात अधिव्याख्याता. दोन अनुवादित व एक संपादित अशी तीन पुस्तके प्रकाशित. अंधांसाठी मराठी साहित्यकृतींचे ध्वनिमुद्रण. ललित व संशोधनपर लेखन.

- डॉ० सदाशिव **देव :** एम०एस्सी०,पीएच०डी०,गोवा विद्यापीठाच्या सायन्स फॅकल्टीचे डीन म्हणून निवृत्त. अमेरिकेत सात वर्षे उच्च गणिताचे अध्यापन, १२ विद्यार्थ्यांना पीएच०डी०साठी मार्गदर्शन. इंग्रजीमध्ये सहा आणि मराठीमध्ये दोन पुस्तके प्रकाशित.

- डॉ० ब्रह्मानंद **देशपांडे :** महामहोपाध्याय, विद्याभूषण, प्राचीन मराठी वाङ्मयाचे व्यासंगी संशोधक. 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा' इ० पुस्तके प्रकाशित.

- डॉ० दिलीप **धोंडगे :** सटाणा येथील कर्मवीर सोनवणे महाविद्यालयात मराठी विभागाचे प्रमुख. पीएच०डी.० प्रबंधास मु०श्री० कानडे पुरस्कार, संतपीठाचा रु० २५ हजाराचा महाबँक पुरस्कार व डॉ० व०दि० कुलकर्णी समीक्षा पुरस्कार. पुणे विद्यापीठाच्या ३ पाठ्यपुस्तकांचे संपादन. यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठासवाठी ५ पाठ्यपुस्तकांचे लेखन. मराठी अभ्यास परिषदेचा महाबँक पुरस्कार.

- विवेक **भट :** रासायनिक अभियंता. वयाच्या पन्नाशीनंतर संस्कृत व भाषाविज्ञान या विषयात एम०ए० सध्या भाषाविज्ञानात पीएच०डी०साठी संशोधन करीत आहेत.

- प्रकाश अर्जुन **भामरे :** एम०ए०,बी०एड०,एम०फिल० सेट व नेट परीक्षा उत्तीर्ण. मराठी विभाग प्रमुख, ग.तु. पाटील महाविद्यालय, नंदुरबार. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाच्या मराठी अभ्यास मंडळाचे सभासद, प्रथम व द्वितीय वर्ष, कला आणि प्रथम वर्ष वाणिज्य यासाठीच्या पाठ्यपुस्तक संपादन मंडळांचे सभासद, सामाजिक कार्यात सहभाग.

- रमेशचंद्र **पाटकर :** विल्सन महाविद्यालय, मुंबई येथून मराठी-विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. 'आत्मचरित्र : एक साहित्य प्रकार' या विषयावर पीएच०डी०. 'कलेचा इतिहास : भारतीय पाश्चात्य', हे पुस्तक महाराष्ट्र राज्य कला संचालनालयाने प्रकाशित केले. माधव सातवळेकरांच्या चित्रसंग्रहात सातवळेकरांची दीर्घ मुलाखत समाविष्ट. प्रा० बाबुराव सडवलेकरांच्या लेखसंग्रहाचे ('महाराष्ट्रातील कलावंत : आदरणीय व संस्मरणीय') संपादन. 'शहीद भगतसिंग : आठवणी, विवेचन आणि विचार', 'मराठी नियतकालिकांतील दृश्य विचार' ही अन्य पुस्तके. कथा, कविता, साहित्यसमीक्षा यांचे लेखन.



अनुक्रमणिका

- विजय **पाध्ये :** पुण्यातील तीन उद्योगसमूहांमध्ये विविध उच्च पदांवर ३२ वर्षे नोकरी. १९९८ पासून उद्योग समूहांच्या गृहपत्रिकांचे संपादन. अभियांत्रिकी, मानव संसाधन, औद्योगिक संबंध, विकृतिशास्त्र, दूरसंचार इ० क्षेत्रांतील दस्तावेजांचे इंग्रजीतून मराठीत भाषांतर करण्याचे काम स्वतंत्रपणे करतात.

- डॉ० रत्नाकर बापूराव **मंचरकर :** एम०ए०,पीएच०डी०;मध्ययुगीन मराठी वाङ्मय, नवे साहित्य प्रवाह, संशोधन, समीक्षा, कथनमीमांसा, वाङ्मयेतिहास, साहित्यिक भूगोल, भाषाविज्ञान, वाङ्मयाचे अध्यापन, राजकीय तत्त्वप्रणाली, शिक्षण आणि समाज, तौलनिक साहित्य या अभ्यासक्षेत्रांत ९ ग्रंथ, ४ सूत्रसंपादने, ८ संपादने आणि तीनशे शोधनिबंध; दोन राज्यपुरस्कार, तीन जीवनगौरव पुरस्कार आणि प्रतिष्ठित संस्थांचे ७० पुरस्कार.

- शरदिनी **मोहिते (वावर) :** एम०ए० (मराठी व संस्कृत). ६० नियतकालिकांत लेखन, समाज-शिक्षणमालेमध्ये साहित्य, इतिहास, भाषा, भूगोल, मानसशास्त्र इ० विषयांवरील पुस्तके प्रकाशित. बालांसाठी चार कादंबऱ्या. 'थर्ड वेव्ह' (ऑल्विन टॉफ्लर), 'देवदास' व 'परिणीता' (शरच्चंद्र चतर्जी) या पुस्तकांची भाषांतरे प्रकाशित.

- डॉ० वैखरी **वैद्य :** एम०ए०,पीएच०डी०, मॉडर्न महाविद्यालय, शिवाजीनगर, पुणे ५ येथे सुमारे १२ वर्षे अध्यापनाचे कार्य. 'ओरिएंट लाँगमन' या संस्थेत 'संपादक' म्हणून काम करण्याचा अनुभव. 'साहित्य सूची', 'मिळून साऱ्याजणी' इ० नियतकालिकांतून लेखन.

## आवाहन

(१) **परिषदेचे संकेतस्थळ** : दि. १ मे २००८ रोजी परिषदेचे संकेतस्थळ सुरू झाले आहे. त्याचा पत्ता **www.marathiabhyasparishad.com** या संकेतस्थळावर परिषदेची घटना. पदाधिकारी, कार्यक्रमांची छायाचित्रे. 'भाषा आणि जीवन'चे अंक. सभासदवर्गणी इत्यादी माहिती उपलब्ध आहे. सभासदांनी या संकेतस्थळावरील मजकुराचे परिशीलन करावे. आपला अभिप्राय कळवावा आणि सूचनाही कराव्यात.

(२) 'मराठी अभ्यास परिषद'च्या आजीव सदस्यांनी तसेच वर्गणीदारांनी आपला **e mail** चा पत्ता कृपया कळवावा. त्यामुळे आपल्याशी संपर्क साधणे सुलभ होईल.

